



नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







भारत सरकारचे १९६५ चे श्रेष्ठता प्रमाणपत्र मिळविणारे एकमेव मराठी मासिक

# दीपावली

साहित्य-कला-सङ्गम



एप्रिल १९६६ • वर्ष २२ वे • मूल्य १ रु.

## श्रेयनामावलि—

★ **आम्ही असे लिहितो**—प्रा. वामन चोरघडे (मुलाखत) —श्री. प्रभाकर अत्रे • **अंदमान ते आनंदमान**—एक कायाकल्प (प्रवास) कथा—श्री. माधव राजवाडे • **खास स्फोटक लेख**—संत तुकारामाचा शेवट—श्री. गोपालसिंग परदेशी. • **औषध तपासून घ्या** —शर्विकल

★ **कथा**—आवडते झाले म्हणून काय झाले—गाढवाला डोक्यावर घ्यायचं म्हणजे (**हट्टी गाढव**—अनुवादक—प्रा. मनोहर सरदेसाई) • पश्चातापे जळती पापे (**कशी रे तुला भेटूं !** —श्री. रंगनाथ कुलकर्णी) • त्याचा आज 'सण' होता (**लय** —प्रभाकर पुराणिक) • **रात्री भूत शिरते** —वि. रा. भाटकर • एकपानी कथा—(**आवर्त**—रत्ना सुप्रिया) आणि वेदना फार सुंदर बोलते ह्याचा साक्षात्कार घडविणारी एक आगळी, अविस्मरणीय कथा (**नथणी**—प्रा. रा. रं. बोराडे).

**याशिवाय**

**माझ्याच गुन्हा**—(कविता) — अं. दि. माडगूळकर, **दीपमाला, सन्मान पुष्पें, विनोदी किंचितिका** (ह. शि. खरात), **ऐसी अक्षरें रसिके, एक नवे खुसखुशीत सदर—असे पाहिले, असे ऐकले** (बन्या बापू), **भरपूर** व्यंगचित्रें व हास्याचे तुषार—**पानपुरी**



● संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किमत १ रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अविकृत मतें असतातच यसें नाहीं.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57

DIPAVALI : Dalal Art Studio, 40–42, Kennedy Bridge, Bombay – 4.

Gram : Dalalart

टे. नं. ३५७७६५



अनुक्रमणिका



## दलाल आर्ट स्टुडिओ


४२, केनेडी ब्रीज, मंबई ४,
टेलिफोन : ३५७७६५
★ तारेचा पत्ता DALALART


● **वर्गणीदारस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टु डओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गि-हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# संघर्षातुनि घडते जीवन–

संघर्ष हा जीवनाचा आत्मा आहे. द्वंद्व हा जीवनाचा स्थायीभाव आहे. भांडण ही माणसाची प्रकृति आहे. त्यातून कळत नकळत माणूस प्रगत होत जात असतो. त्याची जगण्याची जिद्द वाढत असते. जीवनाच्या कणाकणावर आणि क्षणाक्षणावर स्वामित्व गाजविण्याची त्याची कांक्षा फुलत असते. तो संघर्ष संपला, ती जिद्द उरली नाही. नवे नवे मिळविण्याची, पादाक्रांत करण्याची कांक्षा त्याच्या मनाला सोडून गेली की, मग उरते काय ? एक साधं, मिळमिळित जीवन– नव्हे जीवनाचा भास !! ह्या संघर्षात्मक जीवनासाठीच माणसे 'जीव' टाकतात. प्रसंगी जीव घेतातही. ही ईर्षाच काही नवे संशोधन करते. नवा मानव घडत जातो. तो नवा मानव हा पुष्कळदां चितेचा विषय बनतोही. पण प्रत्येक माणसाची जडणघडण ही कळत नकळत त्या काळाची 'निर्मिती' (प्रॉडक्ट) असते. त्या नव्या रूपाबद्दल अचंबा वाटला तरी अनुकंपा वाटण्याचे कारण नाही. कारण असे रूपही एक अपरिहार्य देनच असते. ती स्वीकारावीच लागते. आजच्या बदलत्या व क्षणाक्षणाला नवी रूपें घेणाऱ्या समाजात हे नवे 'मानवी' रूपही आपण प हिले पाहिजे. त्या नव्या रूपाची भाषा समजून घेतली पाहिजे. त्याचा अर्थंही समजून घेतला पाहिजे. अखेर कितीही बदल झाले आणि कितीही रूपे बदलल्यासारखी वाटली तरी मानवी मनांतले 'सनातन' कधी बदलेल असे वाटत नाही. त्या सनातनानेच सतत कला–साहित्याला इंधन पुरवले आहे. ते सनातन काम, क्रोध, आदि विकारात दडले आहे. माणूस कितीही शिकला, 'यांत्रिक' झाला वा सम्राट झाला तरी प्रीति त्याला सोडीत नाही. वात्सल्याचा त्याला विटाळ होत नाही. तो मोहात पडतो आणि त्यासाठी त्याला 'राज्यत्याग'ही धर्म्य वाटतो. मागे इंग्लंडची राणी एलिझाबेथ येथे आली होती. निरोप प्रसंगी ती म्हणाली कीं, हे सारे सोहळे उपभोगीत असताना माझे लक्ष इंग्लंडला असलेल्या माझ्या लहानग्याकडे लागलेले असे. आजचा मानव यंत्रमानव झाला आहे. कारण आज त्याची रेसच मुळी यंत्राशी लागली आहे. ती आजच्या काळाची जणु गरजच आहे. त्यातून जीवनाला एक प्रकारची गति आली आहे. थंड, संथ, रवंथ करीत जीवन रेटण्याची आजची परिस्थितीच नाही. तरीही पण आजचा माणूस हा 'माणूस'च राहिला आहे. आणि जोपर्यंत मनुष्यातल्या ह्या सनातन प्रकृति (व विकृति) कायम आहेत, तोपर्यंत तो माणूसच राहील. त्याच्यातले 'नाट्य' मरणार नाही. 'काव्य' ओसरणार नाही. त्याच्यातल्या काव्यनाट्याचे रूप फार तर बदलेल. पण तशी बाह्य रूपे नेहमीच बदलत आलेली नाहीत काय ?

औदुंबर येथे यंदा पु. ल. देशपांडे यांचे व्याख्यान झाले. तेथे त्यांनी "खेडे बदलले. खेड्यातले काव्य लयास जाईल अशीभीति वाटते. अभंग, ओवी, कीर्तनाची परंपरा तुटेल असे म्हणणाऱ्या आम्हासारख्यांची चेष्टा केली आहे." असे सांगून सुप्रसिद्ध कवि ग. दि. माडगुळकर यांनी त्यांना उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. भूपाळी, अभंग, ओवीचे मंगल सुराबरोबर खेड्याला जाग येत असे. देवळांतून कीर्तनाचा गजर होत असे. माडगुळकर पुढे म्हणतात की, ती ओवी होती तेव्हा रग नव्हतीच ! इथे माणसाच्या अंगभूत आकर्षण केंद्रांचा विसर पडला आहे. मुंबईचे जीवन 'यांत्रिक' आहे. पण तितकेच कलापूर्ण, रसिकतेन नटलेले, काव्यात्म जिद्दीचे, संघर्षांचेही आहे. तिथे फुलते कांक्षा आणि घडतात बुद्धि–प्रतिभेचे अनेक चमत्कार ! अखेर ह्या साऱ्या गोष्टी बाह्य यांत्रिकत्तेवर अवलंबून आहेत की, आंतरिक रसवत्तेवर? काव्य फुलते कुठे आणि जगते कशावर ? सावरकरांची कित्येक सुंदर काव्येही तुरुंगाच्या भिंतींवर साकारली. जगातले फार मोठे काव्य-साहित्य प्रतिकूलतेत जन्म पावले आहे. कारण बाह्य यांत्रिक–अयांत्रिकतेवर मुळी ते निर्भर नसतेच ! ते असते अखेर स्वतःतच. स्वतः जवळच !! खेडे बदलले तरी काव्य मरेलच असे नाही. गिरण्यांच्या भोंग्यांचे पार्श्वसंगीत घेऊन कदाचित् ते नव्या रूपात आविष्कृत होईल इतकेच ! पण नव्या, गतिमान जगात ह्या नव्या रूपांचा साक्षात्कार करून घेतलाच पाहिजे. ते आता टाळता येणार नाहीं. रूप बदलले तरी काव्य जगणार आहे. नाटकांचा आकार सोयीचा झाला तरी 'नाट्य' राहणारच आहे. कदाचित् ते अधिक सूक्ष्मही होईल. कारण अखेर ह्या सनातनातूनच तर साहित्यातल्या सनातनाची निर्मिती होत असते. त्या 'सनातना'वरच्या कलात्मक श्रद्धा मात्र जपल्या पाहिजेत. तुम्हीं आणि आम्हीही !

–संपादक

## प्रवास वर्णन उत्तम !

स. न. वि. वि.

आताच तुमचा आंतरराष्ट्रीय विनोद अंक वाचण्यात आला. श्री. वसंत सबनीस, ठणठणपाळ, रमेश मंत्री इ. लेखकांचे लेख आवडले. श्री. राजवाडे ह्यांचे प्रवास वर्णन फारच छाँन वाटले. पु. ल. ना वाहिलेले सन्मान पुष्प औचित्यपूर्ण वाटले. थोडक्यात पु. ल. चे विविध रंग दिसून येतात. ह्या अंकाच्या यशाचा जेवढा वाटा लेखकांच्या वर आहे तेवढाच तुमच्या कुशल संपादनाच्या कौशल्यावर आहे, असे म्हणण्याचा मोह आवरत नाही.

अंक उत्तम काढल्याबद्दल पुन्हा एकदा अभिनंदन कळावे.

आपला.

मालाड (पूर्व) **गजानन गोरे**

## अंक-ललिताच की दीपावलीचा ?

मार्चचा 'दीपावली'चा विनोद (आंतरराष्ट्रीय) विशेषांक मिळाला.

छान निघाला आहे.

एकूण आंतरराष्ट्रीय विनोदाची काही वैशिष्टचपूर्ण अंगे प्रत्यंगे दाखविणारा ! शिवाय वसंत सबनीसांनी मराठीची बाजू चांगली सांभाळली आहे. चित्रे चांगली व विपुल आहेत. मजा आली आहे. रमेश मंत्र्यांचे 'तीन पलंग' लोकांना फार आवडल्याचे कानी येत आहे. तसेच 'ठणठणपाळ'चे पत्र ! प्रथम वरचे ठणठणपाळचे परिचित प्रतीक चित्र पाहून दीपावलीच्या वाचकांना वाटले की, 'ललित'ने हा 'दीपावली-आंतरराष्ट्रीय-विनोद विशेषांक' काढला की काय ? आणि हा आपल्याला वार्षिक तीन रुपये वर्गणीत मिळणार की काय ? उलट 'ललित'च्या वाचकांना वाटले की 'दीपावली'ने 'ललित'ला पोटात घेतले की काय ? (ठणठणपाळांसह). या प्रश्नांना खरोखरच मला उत्तरे द्यावी लागली म्हणून लिहित आहे: वाचकच ते ! आता पुढील विशेषांकांकडे लक्ष लागले आहे.

आपला,

विलेपार्ले **प्र. श्री. नेरुरकर**

## मौलिक प्रवास 'दर्शन'

स. न. वि. वि.

आपला 'दीपावली'चा मार्चचा अंक वाचून 'संपवला' असे म्हणणे बरोबर होणार नाही. कारण हा अंक गुणाच्या दृष्टीने असा लवकर संपणारा नाही. अंक पहिल्यापासून शेवटपर्यंत वाचनीय आहे ह्याबद्दल शंकाच नाही. परंतु 'ठणठणपाळ' यांचे पत्र वाचताना त्यांच्या शैलीचा 'टाईप' झाला असे खटकले. आपल्या ह्या अंकात विशेष उल्लेखनीय असा जो लेख वाटला तो श्री. माधव राजवाडे ह्यांचा अंदमानावरचा. ह्या पहिल्या लेखांकावरून तरी असे वाटते की, दीपावलीत आतापर्यंत आलेल्या सर्व प्रवासवर्णनापेक्षा हे प्रवास 'दर्शन' केवळ निराळे नव्हे तर मौलिकही असल्याचे दर्शवते. ह्याचे सारे श्रेय आपल्या कलात्मक आणि कुशल संपादनालाच आहे असे मत व्यक्त करण्याचा मोह आवरत नाही. आपला,

**वामनराव मन्यारपलीकर**

## एकांकिका टॉप !

म. न. वि. वि.

नुकताच मी आपला माहे मार्चचा 'आंतरराष्ट्रीय विनोद विशेषांक' व वर्षारंभ विशेषांक वाचला. अंक फारच आवडला. अंक एकदम 'टाप' हं दलाल ! संपादक 'ललित'चे ठणठणपाळ यावेळी आपल्याकडे आलेले दिसतात ! ह्या खास 'ओरिजनल'वर आपण एकदम खूष ! पत्र खरोखरीच 'ओरिजनल' आहे.

ह्याप्रमाणे मुद्दाम उल्लेख करावयाचा तो वसंत सबनीसांचा अन् रमेश मंत्र्यांचा ! सबनीसकृत 'आम्ही सौजन्यात आहो' ही एकांकिका टॉप वाटली. त्याचप्रमाणे रमेश मंत्र्यावर एकदम खूष ! पलंगाच्या विनोद कथा खरोखरच विनोदी आहेत. परकीय असल्या तरी सुंदर !

बाकी रेगे, कामत, अत्रे सर्व ठीक वाटतात. सन्मान पुष्पातले 'पु. ल. दे.' यांचे पुष्प सुगंधी वाटते. देशी विदेशी व्यंगचित्रे, विनोद, पानपुरके आवडली.




मुखपृष्ठ नेहमीप्रमाणे ठीक आहे. बाकी एकंदर अंक छान वाटला.

मागील अभिप्राय पोचला की नाही ? कळावे. लोभ आहेच तो वृद्धिंगत व्हावा हीच इच्छा.

आपला,

पुणे–४. **प्रसन्नकुमार अकलूजकर**

## "साऊथ इंडियन पु. ल. !"

स. न. वि. वि.

'दीपावली' चा वर्षारंभ अंक वाचला. भारतात Foreign Aid च्या साह्याने कुठलीही गोष्ट किती चांगली होते ह्याचं उत्तम उदाहरण म्हणजे आपला हा आंतरराष्ट्रीय विनोद विशेषांक ! पण ह्यामुळे श्री. वसंत सबनीस ह्यांनी सौजन्याने निर्माण केलेला स्वदेशी माल अगदीच टाकाऊ आहे असं बिलकुल नाही. श्री. मंत्री-ह्यांच्या तिन्ही पलंग कथा पलंगावर बसून वाचल्यामुळे चांगल्या वाटल्या इतरेजनांनाहि खास imported माल दिल्यामुळे अंकाच्या खुसखुशीतपणात भर पडली आहे. सन्मान-पुष्पात श्री. पु. ल. दे. ह्यांचा फोटो पाहून मात्र ह्यांच्या मालकीची 'चार उडपी गृहे आहेत' ही ओळ फोटो खाली टाकली असतीत तर त्यांच्या South Indian पोझमधील गंभीर फोटोला 'मसाला' रुबाब प्राप्त झाला असता व विनोदातहि भर पडली असती. असो. ह्या विनोद विशेषांकाबद्दल आपले खास अभिनंदन ! कळावे. लोभ आहेच, वृद्धी व्हावी.

आपला

मुलुंड. **दि. श्री. कराडकर**










## उपप्राचार्य वामन चोरघडे

'वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि' असे विष्णुदासांचे वर्णन केले जाते. आणि ते अनेक विष्णुदासांनीं सार्थ केल्याचेही आपण पाहतो. वामन चोरघडे ह्या व्यक्तीच्या संदर्भात मी जेव्हा विचार करू लागतो तेव्हा ते 'विष्णुदास' आहेत अशीच, कां कुणास ठाऊक, माझी प्रतिक्रिया होते. हे बिरुद त्यांच्या बाबतीत वापरताना मला चोरघडे यांच्या दोन बलस्थानांचा उल्लेख करायचा असतो. चोरघडे हे वज्रादपि कठोर आहेत तें त्यांच्या शरीरसंपदेमुळे आणि त्या 'वज्रादपि' शरीराला कदाचित् शोभणार नाही वा आपल्याला संभ्रमात टाकील असे मृदूनि कुसुमादपि मन चोरघडयांना लाभले आहे. चोरघडयांचा प्रथम परिचय झाला कीं वाटतं—खरं म्हणजे दरारा वाटतो, धाक वाटतो. वाटतं एखादा शब्द चुकून निघून गेला तर—पण हे नुसतं प्रथमदर्शनी वाटतंच प्रत्यक्ष अनुभव येतो तो मात्र अगदी आगळा. काहीं वेळा तर भ्रमात टाकणारा—पण अंती सुखविणारा. मनाला नवा विश्वास देणारा ! त्या नव्या विश्वासाची कमाई सुद्धा इतक्या सहज होते कीं तेही आश्चर्य वाटावे. तसे चोरघडे काहीसे अबोल वाटतातही. आपल्या भावविश्वात गुंगून जाणारा, त्यांतल्या चालत्या बोलत्या माणसांच्या सुखदुःखांच्या तळाशी जाऊन त्या प्रतिक्रिया शब्दबद्ध करणारा—समर्पणपणे शब्दबद्ध करणारा, काहीसा स्वप्नाळू, तरल कल्पनांवर स्वार होऊन काव्यात्म भावजीवनाची निर्मिति करणारा महाराष्ट्राचा हा कथाकार वाटला तसा अबोल नाही. पण समोर बसलेल्या माणसाला आपल्या बरोबर घेऊन जाऊन त्या गूढरम्य जगाची सफर घडविणारा वाटाडया—सन्मित्र आहे ह्याचा प्रत्यय मी घेतला. गेली तीस बत्तीस वर्षे चोरघडे निष्ठेने कथा लेखन करीत आहेत. कथेच्या माध्यमातून त्यांचे काव्य स्रवते आणि नाटय रंगते. त्यांचा तत्वचिंतक लघुनिबंधाशी नाते जोडू लागतो, तर कधी एखादा उत्कट अनुभव जणुं ह्या साऱ्याच शक्तींचे अलंकार लेवून शब्दबद्ध होतो. अखेर चोरघडे यांच्या शारीरिक सामर्थ्याइतकेच त्यांचे अनुभव बल, काव्यबल व भावबळ मोठे आहे. आणि म्हणूनच चोरघडयांची कथा कालची कथा झाली नाही. जुनी झाली नाही. उलट आजच्या नवकथेच्या जन्मखुणा उमटवीत ती नवे आविष्कार करतेच आहे. चोरघडे यांचा व्यायामाने घडलेला, जीवनातल्या क्रांतिकार्यादि अनुभवांतूनही सोने पिऊन व लोखंडाचे चणे खाऊन घडलेला देह आणि एखादी सल मजल, घार, सारखी कथा वाचताना, वाचून दाखवताना त्यातल्या भावजीवनाशी समरस होणारा त्यांचा काहीसा दाटून येणारा, भरदार पण हळवा स्वर यांच्या सान्निध्यात काही वेगळी जादू आहे. चोरघडे अर्थशास्त्राचे प्राध्यापक आहेत. नागपूरच्या एका कॉलेजचे ते व्हाइस प्रिन्सिपॉल आहेत. आज ते सुस्थित आहेत. मुले महाविद्यालयात शिकताहेत. जावई आले आहेत. नातवांच्या लीलाही त्यांना सुखावीत आहेत. पण हे सारे 'तृप्त' करणारे जीवन वांटयाला येऊनही चोरघडे 'थांबले' नाहींत, म्हणूनच 'संपले' नाहीत. उलट त्यांची 'जिद्द' कायम आहे. आत्मविश्वास जबर आहे. धडपड कायम आहे. ह्या 'जिद्दी' मुळेच 'कठिणतम' दिवसातून चोरघडे ताठ उभे राहिले. एम्. ए. ची पदवी त्यांनी दोनदा घेतली. दोन वेगवेगळे विषय घेऊन घेतली. चोरघडयांना 'नकार' माहीत नाही. अजूनही त्यांची शोधक नजर नवे जग शोधते आहे. म्हणूनच हैद्राबादचे साहित्य संमेलनाचे पार्श्वभूमीवर, संमेलनाचे रंगमंचावर बसलेले असतानाच त्यांना एक हळुवार विषय सुचला. त्या दिव्यांच्या झगझगाटांत त्यांना 'गवसलेली' कथा त्यांच्याच तोंडून ऐकत असताना चोरघडयांच्या सुकोमल मनाचा क्षणोक्षणी प्रत्यय येत होता. कथा कशी जन्मते हे जाणून घेण्यासाठी मी गेलो होतो. आणि एका कथेच्या जननाची, एका सृजनाची कथा साकार होती—माझ्या समोर ! 'मॅटर ऑफ फॅक्ट' चोरघडेहि 'मॅटर ऑफ फॅक्ट' रहात नाहीत. मला वाटते हीच तर कलेची किमया आहे. हेच ह्या पोलादी पुरुषाचे खरे खुरे बलस्थान आहे. हे बलस्थान चोरघडयांनी ओळखले आहे. आणि म्हणूनच चोरघडे हे आश्रमात राहिले. क्रांतिकार्यात पडले. भुतांच्या शोधात हिंडले. अर्थशास्त्र शिकवीत राहिले. तुरुंगाचीही वारी करून आले. अंगभर खादी ल्याले आणि तरीही त्यांची 'कविता' ही त्यांची 'वनिताच'









अनुक्रमणिका

# दृष्टि पडेल ती ती वस्तु सुंदर झालीच पाहिजे. तेथे सौंदर्य फुललेच पाहिजे हीच माझी कलेच्या मागली धारणा आहे, श्रद्धा आहे.

आम्ही असें लिहितों :८:

राहिली. त्यांच्या प्रतिभेला पडणारी सृजनाची स्वप्ने ही चिरनव राहिली. कोणताही 'इसम' चोरघड्यांच्या कलाकाराला जिंकू शकला नाही. कारण कलेवर (आणि कथेवरही) नितांत श्रद्धा बाळगणारा असा हा कथाकार आहे. चोरघडे यांच्या सहवासात व गप्पातही माणसाच्या मनांचे सूक्ष्म व्यवहारही 'सरूप' होऊन येतात. त्यांच्या हंसण्या-बोलण्यात नागपुरी मनमोकळेपणा आहे. निरहंकारता आहे. चिंतनाचा स्पर्शही जाणवतो. सौंदर्यावर तर त्यांची अपार श्रद्धा आहे. साक्षेप आहे. टापटीप आहे. अक्षर कसं स्वच्छ, दाणेदार, टपोरे–आहे. व्यक्तित्वांत ऋजुता आहे. तोंडात फक्त पान मात्र सारखं रंगत असतं. आणि ते जर रंगलेलं असलं तर मग गप्पाही रंगतात. अनेक कथांच्या 'कहाण्या' होतात आणि त्या 'पुण्य' देऊन जातात.

ते 'पुण्य' जोडण्याची उत्सुकता तुम्हालाही असणारच–चला तर–

## मुलाखत–प्रभाकर अत्रे

**प्रश्न:** आपण आपल्या लेखनाच्या प्रारंभासंबंधी, त्याच्या मागील काही प्रेरणांसंबंधी काही सांगावे अशी इच्छा आहे.

**चोरघडे:**–सांगतो. १९२९–३० साली मी लेखनाला सुरुवात केली. त्यावेळी मी ९ वीत शिकत होतो. मनांत एक प्रकारचा गंड होता. त्याची कारणे दोन. एक तर मी खेड्यातला होतो. दुसरे घरी मूर्तिमंत दारिद्र्य होते. ते जगांत वावरतांना लपवावे–झाकावे लागत होते. ह्या दारिद्र्यातून आपले डोके कधीच वर निघणार नाही अशीच मनाची धारणा झाली होती. मनाने खचलो होतो. नामोहरम झालो होतो. मी शिकावे असेही घरी कुणाला वाटत नव्हतें. वाटेल कशाच्या बळावर? नववीत मला स्कॉलरशिप मिळाली. नागपूरला मला एक मित्र भेटला. त्याची परिस्थिती माझ्यापेक्षां बरी असली तरी उत्तम नव्हती. त्याने मला धीर दिला. "निराश होऊं नकोस" असे सांगितले थोडा सावरलो. पटवर्धन हायस्कूलमध्ये नांव घातले. शाळेतील बरीच मुले श्रीमंत व चांगल्या घराण्यांतली होती. स्वस्त भाड्याची खोली घेऊन मी व माझ्या थोरल्या बंधूसह राहत होतो. मला व्यायाम–खेळाचे वेड होते. क्रिकेट मला चांगले येत होते पण परिस्थिती, बूट,-कपडे वगैरे खर्चाचा विचार करून मी त्यात भाग घेत नसे. साऱ्याच हौशींबाबत थोडेफार असेच होत असे. पुढे हस्तलिखित मासिक काढायचे ठरले तेव्हा मात्र मला एकदम वाटले की, हे काम आपल्याला जमण्यासारखे आहे. परिस्थितीने निर्माण झालेल्या गंडातुन बाहेर पडण्याला त्यात वाव आहे असे वाटले. त्या हस्तलिखिताचे नांव **चेतना!** लेखक, संपादक मीच होतो. चांगलं तीन वर्षे मी ते मासिक चालवलं. आगरकरांचे निबंध निबंधमाला वगैरे मी वयाच्या पंधराव्या वर्षीच वाचून टाकली होती. पण त्यावेळी समजत मात्र फारसं नसे. वयाच्या सातव्या आठव्या वर्षापर्यंत तर मी मराठी भाषा देखील धड बोलू शकत नसे कारण खेड्यात गोंड-गोवारी यांच्यामध्ये माझा वावर होता.

**प्र:**– त्या 'चेतना' हस्तलिखितातल्या प्रारंभीच्या लेखनाची काही कल्पना?

**चो:**–ती एक मजाच होती! विषयांची नांवे ऐकून तुम्ही थक्क व्हाल. एक विषय आठवतो. त्याचं शीर्षक होतं. **"स्त्री पुरुषामधील उच्चतर प्रेमाचा विपर्यास"** मी त्यावेळी पंधरा सोळा वर्षाचा होतो. असे अनेक निबंध मी तेव्हां लिहिलेले आठवतात. आगरकर–चिपळुणकरी मोठी प्रौढ भाषा मी वापरत असे. त्यांतून एक जाणीव फुलत गेली. मासिकाचे अक्षर, सजावट सारे मीच करीत होतो. त्यांतून माझ्या भाषेला, अक्षराला एक प्रकारचे वळण लागत गेले. त्यावेळी खेड्यात किंवा तालुक्याच्या हायस्कूल मिडलस्कूल-मध्यें वर्गात खूप मोठी, अडदांड मुले असत. मी त्यावेळी नाजुक, गोमटा असा होतो. ती मुले मला चिडवीत. त्यामुळे मी आखाड्यांत जाऊं लागलो. मेहनत करून करू लागलो. त्यामुळे आत्मविश्वास वाढला. शरीर सुदृढ झाल्याने धाडसाचे आकर्षण वाढले. हेरगिरी, क्रांतिकार्य, भुताखेतांच्या गोष्टी यात रस वाटू लागला. क्रांतिकारकांचे वाङ्मयही खूप वाचले. लाठी काठी शिकलो. ती चांगली येऊं लागली. रात्रीच्या रात्री भुताखेतांच्या शोधात नद्या, जंगले, मसणवटी पालथ्या

घातल्या. पण मन अस्वस्थच राहिले. हे सारे काही तोकडे आहे असेच वाटत राहिले. मनाची भूक वाढत होती. क्रांति-कार्याचे आकर्षण होतेच. त्याच भावनेपोटी मी एक प्रदीर्घ लेख लिहिला. त्या लेखाचे नांव होते **वंदना** ! १८५७ ते १९३० पर्यंतच्या साऱ्या देशभक्तांना मी एकत्र आणले होते. त्या लेखाच्या शैलीसंबंधी मला अजूनही आठवते. त्यांत मी त्या क्रांतिकारकांना भेटायला गेलो आहे. मी त्यांच्याशी बोलतो आहे अशी कल्पना केली होती. नानासाहेब पेशवे, झांशीची राणी ह्या साऱ्यांशी प्रत्यक्ष बोलून मी त्यांना वंदना केली होती. त्यावेळी मी चिपळूणकर, गीतारहस्य पोथीच्या श्रद्धेने वाचले. मामांनी शांकरभाष्य शिकवले होते. त्या संस्कारातून वाचन मला सोपे गेले. विश्वास वाढत गेला.

**प्र**:– आपली पहिली कथा कोणती ? ती कधी लिहिली ? कुठे प्रसिद्ध झाली !

**चो**:–१ ऑगस्ट १९३२ ला मी पहिली कथा लिहिली. तिचे शीर्षक आहे अम्मा! नागपूरच्या 'मुलांच्या मासिकांत' ती प्रसिद्ध झाली.

**प्र**:– त्यानंतरच्या काळांत चांगल्या प्रथितयश मासिकांत आपली कोणती कथा प्रथम प्रसिद्ध झाली ?

**चो**:– **कांचेची किमया** ही गोष्ट 'प्रतिभा' नांवाचे पाक्षिक पूर्वी प्रसिद्ध होत असे त्यांत प्रसिद्ध झाली. तिच्या प्रसिद्धीचा किस्सा मोठा गंमतीदार आहे.

**मी**:–सांगा तर !

**चो**:–इंग्रजी पहिलीत असताना एक मजेशीर अनुभव मला आला. रोज सकाळी उठून धांवण्याच्या व्यायामासाठी मी बाहेर पडत असे. तेव्हां १३ ते १४ वर्षांची एक युरोपियन मुलगी मला रोज नेमाने दिसायची. इंग्रजी त्यावेळी नव्यानेच शिकत असल्याने कौतुकाचा विषय होता. मी तिला रोज 'गुड मॉर्निंग' म्हणायचा ! तीही गोड हंसायची व परत 'गुड मॉर्निंग' म्हणायची. ते हास्य मला फार आवडायचे. त्या मुलीचे नांव होते ज्यूलिया ! त्यावेळच्या माझ्या भावना– प्रतिक्रिया मी दहा वर्षांनी त्या कथेंत मांडल्या. ती कथा लिहिली ३ एप्रिल १९३३ रोजी ! तिला नांव दिले **बहीण.** प्रतिभेला पाठवून दिली. "प्रतिभा" श्री. हरिभाऊ मोटे यांची. संपादकांमध्यें तेव्हां श्री. के. नारायण काळे होते. त्यांना कथा आवडल्याचे पण संस्कार करून व शीर्षक बदलून ती प्रसिद्ध करीत असल्याचे त्यांनी कळविले. त्यांनी कथावस्तूला धक्का न लावता काही संस्कार केले. आणि नांव दिले **'कांचेची किमया'** ! खरं म्हणजे मला ते नांव मुळींच आवडले नाही. पण त्यांच्या सद्भावनेचे स्मरण म्हणून मी ते नांव कायम ठेवले आहे. **कांचेची किमया** ही कथा प्रतिभेंत आल्याने तिला एक प्रकारचे स्टेटस आले. मला खूप पत्रेही आली. माझे संस्कृतचे प्रोफेसर होते. त्यांनी मुद्दाम बोलावून मला शाबासकी दिली. काही काही विषय फार नाजुक असतात. त्यांना धक्का लागेल की, काय अशी कधी कधी भीति वाटते. **आपुले मरण** ही गोष्ट वाचून दाख वितांना तिला दृष्ट लागेल अशी मला नेहमी भीति वाटते.

**प्र**:– पुष्कळशा साहित्यिकांच्या साहित्यिक कारकीर्दीची सुरुवात कविता लेखनाने होते. आपल्या कथांची प्रकृतीही काव्यात्म असल्याचे जाणवते. मग आपण कधी काव्य लेखन वगैरे केले काय ?

**चो**:–मुळीच नाही ! माझी काव्यासंबंधीची भूक माझ्या कथेतून भागली. त्यामुळेहि मी कदाचित काव्य लेखनाच्या भान-गडीत पडलो नसेन. पण प्रत्यक्ष एकही कविता मी लिहिली नाही.

**प्र**:– कथाविषय सुचल्यानंतर आपण त्याची डायरीत नोंद वगैरे करून ठेवतां ? सबंध कथानक लिहून ठेवण्याची आपली पद्धत आहे किंवा काय ?

**चो**:–वाचतांना, कुणाशी बोलतांना, एखादी कल्पना सुचल्या-नंतर एखादे महत्वाचे वाक्य, महत्वाची लकब मनांत चमकते. त्या वाक्यांची, लकबांची, वैशिष्ट्यांची मी नोंद घेतो. नोंद घेण्याची पद्धतीहि सोपी असते. जसे 'ती स्टेशनवर भेटलेली बाई . . . . तिची वैशिष्टये' एवढीच नोंद मी घेतो. कथाविषय सुचला की, त्याखाली तारीख घालतो. स्थळाची नोंद करतो. अशी नोंदवही भरत जाते.

**प्र**:– ह्या नोंदवहीतल्या नोंदी पाहून लिहिणे जमते ?

**चो**:–आतां लिहिलं पाहिजे असं वाटूं लागलं की, नोंदवही चाळतो. प्लॉट निश्चित करतो आणि लिहूं लागतो. त्या hints मला पुरतात.

**प्र**:– आपल्याला गोष्टीची कथानके कशी सुचतात ?

**चो**:–मला subtlties चे फार आकर्षण आहे. एखादी घटना घडली की, तिच्या मागच्या अंतःप्रेरणांचा शोध घेण्याची माझी वृत्ति आहे. कुणी कथा वाचून दाखवून सांगू लागला की ही 'सत्य कथा' आहे, तर मला ते पटत नाही. कथा



"बरं, आता तुझ्याबद्दल, तुझ्या साहसांबद्दल, तुझी स्वप्ने तुझ्या महत्वाकांक्षा, तुमा टलिफोन नंबर..."











लेखन हे 'रिपोर्टिंग' नाही. ती एक 'कला निर्मिती' आहे असे मला वाटते. घटनांच्या मागले भावसत्य शोधून काढणे, त्यांचे पृथःकरण करणे हे कलावंताचे काम आहे. त्या अर्थाने मी कलेकरता कला मानतो. दृष्टी आहे म्हणून सृष्टि आहे. अंतःदृष्टी आहे म्हणून सृष्टि आहे. पशु जेवतो–खातो–पितो. पण माणूस नुसताच जेवत नाही. त्याने ताट शोधून काढले. पाट शोधून काढला. साध्या जेवणाला सुद्धां तो कलात्मक रूप देतो. एखादी गोष्ट कशी करतो ह्यालाही एक प्रकारचे महत्त्व आहे हे तो जाणतो. म्हणूनच रिपोर्टिंगवर माझा विश्वास नाही. ती 'सत्यकथा' असली तरी मी तिला 'कला-कृति' म्हणणार नाही. मला माणसे भेटतात. त्यांच्या कथा मला कळतात. पण त्या कथांच्या मागच्या अंतःप्रेरणांचा शोध घेण्याचा माझा प्रयत्न असतो. त्यांतूनच मला कथा सुचतात. त्यांतल्या नाजुक धाग्यांचेच मला अधिक आकर्षण वाटत आले आहे.

**प्र**:– कथा सुचल्यानंतर लगेच लिहून होते की काही काळ जातो ?

**चो**:–कधी कधी जातोहि ! 'ख्याल' ह्याच गोष्टीचं घ्याना ! खूप दिवस ती माझ्या डोक्यात होती. ग. दि. माडगूळकरांना ती गोष्ट मी सांगितली. सांगता सांगता काही तपशील भरत गेला. कथा कशी मांडायची याबद्दल मी फार जागरूक असतो. त्यासाठीच माझे चिंतन चालते. प्रत्येक कथा हे एक जणुं कला दृष्टया आव्हान आहे असेच मला वाटत आले आहे. त्यामुळे मी कधी कधी तिथे अडतो. जिद्दी स्वभावामुळे मी थांबूनही राहतो. 'कथा लेखन' हा एक 'कला–विलास' आहे अशी माझी धारणा आहे. त्या 'विलासा'च्या भावनेने, जिद्दीनेच मी लिहीन. त्यामुळेच मध्यंतरी काही वर्षे मी कथा लेखन केले नाही. चिंतन मात्र चालूं होते.

**प्र**:– कथा सुचल्यानंतर कमीत कमी वेळात लिहिली वा जास्तीत जास्त वेळ लागला अशा कथा कोणत्या ?

**चो**:–सांगणं कठिण आहे. पण बसलो की सुचतं. लिहून टाकतो. पण बहुसंख्य कथा कधीतरी सुचल्या, कधीतरी लिहिल्या असंच झालं आहे. नित्य कामे चालतात. त्यातून वेळ काढून लिहितो.

**प्र**:– कथा लेखन करतांना काही खास वातावरणाचा आग्रह ! वेळेचे वगैरे काही नियम वगैरे ?

**चो**:–लौकिक अशा कुठल्याच गोष्टींचा आग्रह नसतो. कुठल्याही वेळी मला लिहायला जमते. वेळेचे बंधन नाही. स्थळाचेही बंधन नाही. काही खास खाद्यपेयांचाही आग्रह नाही. विशिष्ट जागाच हवी. टेबलखुर्चीच हवी. असेही नाही. फक्त एकच आग्रह असतो की आपण जे काही करतो त्यांत कसूर होऊं नये.

**प्र**:– आपली लिहिण्याची पद्धत काय असते ?

**चो**:–मी कथा सांगतो. लिहित नाही. ती सांगून झाल्यावर तिची

[ पृष्ठ ५७ वर पहा ]



# मृत्युंजयाचा आत्मयज्ञ

स्वातंत्र्यवीर सावरकर गेले. मृत्युंजय सावरकर गेले. महाकवि सावरकरांचे महाप्रयाण झाले. नाटककार सावरकर जगाच्या रंगभूमीवरून मृत्यूच्या पडद्याआड गेले. ओजस्वी वक्तृत्व मूक झाले. प्रखर ध्येयनिष्ठा एक महान वारसा ठेवून निघून गेली. क्रांतिकारकांचा प्रपितामह शान्त झाला. अविचल राष्ट्रनिष्ठा, राष्ट्रविचार करीत करीतच जगली आणि राष्ट्रनिष्ठेचाच विचार करीत करीतच अस्तंगतही झाली. प्रखर द्रष्टेपण पुढच्या पिढींसाठी आपले अचूक आणि अमर सिद्धांत ठेवून निघून गेले. कारावासाच्या भिंतीवर घायपाताच्या कांट्याने महाकाव्यें कोरून ती मुखोद्‌गत करून व खोली बदलल्यावर दुसऱ्या बंदिजनांकडून ती पाठ करून घेऊन भारतात पाठविणारा महाराष्ट्र-चारण मूक झाला. परदेशी कापडाची पहिली होळी पेटविणारा, अंगातला अंगार भोंवती पेटवणारा, मोरिया बोटीवरून मार्सेलिसच्या किनाऱ्यावर जाण्यासाठी त्रिखंड गाजवणारी उडी मारणारा व फ्रान्सच्या किनाऱ्याला लागतांच आपली मुक्तता हेगच्या आंतरराष्ट्रीय न्यायालयात करवून घेण्याचा पहिला महान प्रयत्न करणारा विधिज्ञ, अंदमानच्या विजनवासांतही राष्ट्रचिंताच वाहणारा, असामान्य कष्ट उपशीत असतांनाही शुद्धि–संघटना कार्याने प्रत्यक्ष 'मृत्यू' वर मात करणारा कल्पक कार्यकर्ता, विज्ञान निष्ठेने आमच्या भोंगळ रुढींवर प्रखर हल्ले चढविणारा तत्वज्ञ सुधारक, क्रियाशीलतेने ते विचार सिद्ध करण्यासाठी शुद्धिकार्य आणि पतितपावन मंदिराची स्थापना इत्यादि कार्यक्रम हाती घेणारा कर्ता समाजसेवक, अग्नि आणि फुले ह्यांना हृदयांत









सारख्याच सातत्याने जपणारा क्रांतिकारक – कवि, मूर्तिमंत निर्भयता, असीम त्याग, असाधारण बुद्धिमत्ता, निर्मितिक्षण प्रज्ञा, आणि मूर्तिमंत समर्पण ज्यांच्या व्यक्तित्वात एकवटले होते असे सावरकर दिवंगत झाले. यज्ञवेदी शांत झाली. धगधगलेले स्थंडिल आहुती घेऊन 'धन्य' झाले. क्षणोक्षणी मृत्यूशी झुंज देणारे, मृत्यूला आव्हाने देणारे आणि तरीही मृत्यूच्या मिठीतून वारंवार सुटणारे सावरकर अखेर वयाच्या ८३ व्या वर्षी मृत्यूच्या मांडीवर विराजले. "ये मृत्यो ये" म्हणून वारंवार पुकारूनही तो येत नाही म्हणून अखेर "मग मीच येतो तर !" म्हणून त्याच्याकडे झेपावत जाणारे सावरकर अखेर आत्मार्पण करते झाले. 'धन्य' आणि 'कृतार्थ' सावरकर अखेर खरोखरच कृतार्थही झाले आणि धन्यही झाले.

दुर्मिळ असे व्यक्तिमत्व, असामान्य असा गुणसंचय 'सावरकर' ह्या एका 'कुडी'त झाला होता. त्यांतला एकेका गुणाने जगांत महान चमत्कार करूं शकणारी माणसे आपण पदोपदी पाहतो. इथें तर सद्गुणांचा महासागरच दाटून, उफाळून आला होता. पण हे सारे मातेच्या चरणी समर्पित केले गेले आणि एक 'दीपस्तंभ' जन्म पावला. जें जें उत्तम असेल तें ते तवचरणी वाहण्यासाठींच तर आम्ही प्रतिज्ञाबद्ध झालो ही जाणीव सावरकरांना होती. आणि म्हणूनच त्यांच्या काव्य–नाटकातून–निबंध–भाषणांतून स्रवली फक्त राष्ट्रनिष्ठा ! ! जळून गेले सारे स्वार्थ! १९६१ सालीं पुणे येथे मृत्युंजय महोत्सवांत भाषण करतांना ते म्हणाले होते "मला शासनाने काही उपाधि दिली नाही, माझे घर परत दिले नाही म्हणून कांहींना राग आला. पण मला उपाधीची अभिलाषा नाही. तीन चतुर्थांश भारत स्वतंत्र झाला हे पाहूनच आम्ही सारे काही पावलो आहो. क्रांतीची कल्पना ज्या काळांत पोरकट वाटत होती त्या काळांत तिची उपासना समर्पण बुद्धीने आम्ही क्रांतिकारकांनी केली. शेकडों तरुण फांसावर लटकले. त्यांना कशाचीही अभिलाषा नव्हती. स्वातंत्र्याच्या चळवळीचे ते पहिले पाईक होते. त्या काळांत प्रथम मी मरेन व मागील विजयध्वज घेऊन येणाऱ्या सैन्याचा मार्ग निष्कंटक करीन अशी त्यांची प्रतिज्ञा होती व त्यासाठीं त्यांची अहमहमिका लागलेली होती. देशभक्तीच्याच भावनेने अंदमानला जहाजेच्या जहाजें भरून आली. आम्ही तरुणांनी त्या काळांत ज्या शपथा घेतल्या त्यापासून रतिमात्र ढळलो नाही. अनेक वेळां फाशीच्या खांबाला गदगदा हलविले. येथे परत आलो हा केवळ योगायोगच ! स्वातंत्र्य युद्धातील आघाडीवरच्या पाइकांच्या त्यागाचे फळ म्हणून कांही मंडळी आज मंत्री झाली, अध्यक्ष झाली. आम्हांला आनंद आहे. पुढच्या पिढीला वैभव मिळावे म्हणून तर आम्ही प्राण पणाला लावले होते. त्यांनीं सुखाने त्या जागेवर रहावे." १९६१ साली व्यक्त केलेली भावनाच लाहोरच्या रोखाने भारतीय सैन्य आगेकूच करीत असल्याचे कळल्यावर जो आनंद त्यांनी व्यक्त केला त्याच्या पाठीशी होती. १५ ऑगस्टला त्यांनीं मित्रसुहृदांचा रोष पत्करूनही 'हे माझ्या भारताचे–स्वतंत्र भारताचे निशाण आहे' ह्या भावनेने तिरंगी राष्ट्रध्वज सावरकर सदनावर लावला. 'हाजीपीर' जिंकल्यावरही त्यांनीं अस्थिपंजर अवस्थेंतही 'आनंदोत्सव' केला आणि राष्ट्रध्वज लावण्याची सूचना दिली. शेवटच्या आत्मार्पणाच्या निश्चयानंतर सेवा भावनेने जवळ आलेल्या डॉक्टरांना ते म्हणाले "आपल्या सेवेबद्दल मी कृतज्ञ आहे. पण आतां मला कसलेही औषध नको. माझा शत्रु चचिल गेला. इंग्रजांचे साम्राज्य गेले. भारत स्वतंत्र झाला. पराक्रमी भारताचे मानचित्रही पाक युद्धांत पहायला मिळाले. ज्यांनी खूप जगावं असं मला वाटत होतं. ज्यांनी ह्या देशाला नवे रूप दिले ते शास्त्रीही गेले. आतां मला कशासाठी जगविणार आहांत ? मी कृतार्थ झालो आहे. मी यमाला वारंवार बोलावत होतो. पण तो येत नव्हता. आतां आमचा निरोप घ्या." त्या डॉक्टर्सच्या संचात एक अहिंदु डॉक्टर होते. इतर डॉक्टर्स प्रमाणेच त्यांनाही त्यांनी धन्यवाद दिले. मृत्यूच्या दारांतही ह्या महापुरुषाचें चिंतन–मनन–उच्चारण सारे 'राष्ट्रमय' होते. विचार–उच्चार–आचाराचा हा त्रिवेणी संगम होता. 'जे लिहिले, बोललो, केले त्याबद्दल यत्किंचितहि पश्चात्ताप नाही.' असं म्हणत म्हणत ह्या 'तेजस्विते'ने आत्मार्पण केले. अंतिम इच्छेतही प्रखर बुद्धि-विज्ञान निष्ठाच प्रगट झाली. कारण ती त्यांच्या व्यक्तित्वाचा एक अविभाज्य भाग होती. १९१० च्या मार्चमध्यें सावरकरांना लंडनमध्यें अटक झाली. ब्रिस्टन जेल मधून त्यांनी येसूवहिनींना 'माझे मृत्युपत्र' लिहून पाठविले. त्यांत ते म्हणतात,

"विश्वाचिया अखिल मंगल–धारणाला  
बोला असे कवण भक्ष्य हुताशनाला ?"  
आमंत्रण प्रभु रघूत्तम सोडितां हें  
दिव्यार्थ, देव ! अमुचे कुल सज्ज आहे  
हे साधिव, गर्जुनि असें पहिल्या हवीचा  
हा ईश्वरी मिळविला आम्हीं मान साचा.  
धर्मार्थ देह वदलों ठरलें नितांत  
ते बोल फोल नच बालिश बायकांत  
ना भंगली भिउनियां घृति यातनांना  
निष्काम कर्मरति योगहि खंडिला ना.

दीप्तानलांत निज मातृ विमोचनार्थ  
हा स्वार्थ जाळुनि आम्हीं ठरलो कृतार्थ  
हे मातृभूमि ! तुजला मन वाहियेले  
वक्तृत्व वाग्विभवही तुज अर्पियेले  
तूंतेचि अर्पिली नवी कविता रसाला  
लेखाप्रति विषय तूंचि अनन्य झाला–

सावरकर गेले ! भारताच्या स्वातंत्र्य लढ्यांतील एक तेजस्वी 'सावरकर युग' समाप्त झाले. गणेश-विनायक-नारायण ह्या त्रिवर्ग सावरकर बंधूंनीं भारताचा स्वतंत्र ध्वज धवलकीर्त व्हावा म्हणून सर्वस्वाची जी समिधा यज्ञकुंडी अर्पण केली ती समिधा जळून गेली. पण देशाचे चित्र उजळले. सावरकरांनी सहा सुवर्णपाने लिहिली आहेत. भारताच्या स्वातंत्र्य लढ्यातले सातवे सुवर्णपान २६ फेब्रुवारीला ग्रंथबद्ध झाले. त्या ग्रंथाचे नांव आहे–विनायक दामोदर सावरकर

●●●






# अंदमान ते आनंदमान

## [ पर्व दुसरे ]

**चेतना**

अंदमान—निकोबारचा प्रशासक म्हणून प्रस्थान ठेवले. बोट निघाली. लाटांना प्रश्न विचारीत -'निकोबार' आले काय ? आणि 'निकोबार' आले. आम्ही खाली उतरलो. रिचर्डसन पुढे आले. त्यांनी स्वागत केले. सन्मानार्थ फुटबॉलची मॅच झाली आणि आम्ही निघालो—कुठे ? आम्ही काय पाहिले ? हा रिचर्डसन कोण?........

त्यासाठी लेखकावरोबर चला निघू या !!

—माधव राजवाडे

**अंदमान** आणि निकोबार हा २२३ बेटांचा बंगालच्या उपसागरात कमानीच्या आकारात विखुरलेला समुच्चय आहे. अंदमानकडे जाताना आमची बोट निकोबारला थांबली. निकोबारला मुख्य कमिश्नरानी थांबायचे, त्यांचे स्वागत व्हावयाचे, दिवसाचा मुक्काम तिथे असायचा आणि मग अंदमानकडे निघायचे असा जो क्रम आणि प्रघात पडला होता त्याला अनुसरून निकोबार येथे तयारी झाली होती. या तयारीतील एक वैशिष्ट्यपूर्ण प्रकार असा कीं, आमच्या स्वागतार्थ फुटबालची मॅच ठेवण्यात आली होती.

निकोबार बेटावर पाऊल ठेवताच मनाची पहिली प्रतिक्रिया अतिशय आल्हादाची होते. नाना वृक्षवल्लरीने आणि पुष्पगंधाने नटलेला आणि हिरव्या रंगाने अलंकृत झालेला तेथील निसर्ग पाहताच मन आणि शरीर पुलकित झाले. •उघड्या माळावर वाढलेल्या माणसास हिरवळ, पर्ण-राशी आणि फुले दिसताच काय आनंद होतो याची कल्पना केवळ शब्दांनी पूर्णपणे करून देता येणे शक्य नाही. रखरखीत उन आणि खडवडीत जमीन, कोरडी हवा आणि बोडके डोंगर-कडे यांच्या सरावात आणि सहवासात वाढलेल्या माणसास पवनाने पर्णास पंखे बनवले आहे, जलाने वायूस आर्द्र केले आहे, वायूने नभोमंडळ सुवासित केले आहे आणि सर्वांनी गळ्यात गळा घालून असा फेर धरला आहे कीं, फांद्या-फुले सतत कौतुकाने माना डोलवत आहेत असे अनुभवास येताना निसर्गापुढे कुणीहि अशरण नाही असेच नाही कां वाटणार? संपन्न निसर्गाच्या सान्निध्यात जो वाढला आहे तोहि या रंगात आलेल्या बहारीने बेहोप होऊन जाईल. मग मजसारख्यास आणि तेहि बोटीच्या प्रवासाच्या विरोधाभासाच्या पार्श्वभूमीवर निकोबारच्या रम्य वनश्रीने चेटूक केल्यासारखे वाटले असल्यास त्यात नवल नाही. —त्यातहि बोटीवर घेतलेल्या औषधाने एक प्रकारच्या गुंगीचा जो अंमल होता त्यावर तर हे वातावरण एक सुखद आणि पोषक उतारा होते. अगदी जादू केल्यासारखे वाटत होते. यातहि निकोबारच्या भूमीवर पदार्पण आगळं होतं. बोट समुद्र किनाऱ्याला लागली आणि उतरलो असं नव्हतं. येथे अगदी anchorage वर उतरावं लागतं. म्हणजे समुद्रात बेट असूनहि समुद्रापासून वेगळं असं कमळासारखं वाटलं ! बेट जमिनीच्या रूपात क्षीर सागरातला जणु स्थितप्रज्ञच!

—बिशप जॉन रिचर्डसन माझे स्वागत करावयास सामोरे आले होते. ते सोत्साह आणि सस्मित होते. पण त्यांचे किंचित दुमडलेले ओठ मला असे स्पर्शून गेले कीं वाटावे त्यांच्या मनात बरेच आहे—अपेक्षा, हुरहुर, आशा आणि आशंका? असे वाटले कीं, त्यांना खूपसे सांगावयाचे आहे आणि पुष्कळसे सांगते किंवा नाही या संभ्रमात ते आहेत. पण खरेच संभ्रम असेल काय? छे, छे शक्य नाही. यांची पाऊले तर स्पष्ट आणि ठाम पडताहेत. इतके कमिश्नर आले—गेले आणि आता हे कशी 'करवट' बदलतात हे पाहू असे आव्हान तर त्यात नव्हते? आम्ही दुनियेपासून दूर फेकले गेलेलो येथील रहिवासी सुधारणा व अद्ययावत राहणी यापासून वंचित असलो तरी संस्कृति आणि माणुसकी यापासून आमची फारकत झाली नाही असे ते आपल्या मुग्ध स्मिताने तर सुचवत नव्हते? परन्तु जवळ जाऊन हस्तांदोलन करताना असे जाणवले कीं, त्या स्मितात केवळ उपचार नव्हता. अंगिकृत काम मनापासून केल्याचे समाधान आणि चांगल्या कामात सदा सहकार्यास हात पुढे करण्याचा बाणा प्रकटत होता. एक भरीवपणा वाटला. हे व्यक्तिमत्व पोकळ नसावे असेहि मनात आले. असे असूनहि त्या माणसाबद्दलचे कुतुहल कमी व्हायच्या ऐवजी वाढलेच....

बिशप जॉन रिचर्डसन् हा मिशनरी मूळचा निकोबारी—तेथेच वाढलेला आणि तेथील कार्याला सर्वस्वी वाहून घेतलेला. इ. स. पंधराव्या शतकात जे ख्रिश्चन मिशनरी या बेटात आपल्या धर्म प्रसाराच्या व धर्म प्रचाराच्या कार्याचा आरंभ करावयास पोहोचले, त्यांच्याच परंपरेतला खरा पण बाहेरचा नव्हे.

बाहेरचा नसला तरी त्या बेटावरच्या ख्रिश्चन धर्मप्रसाराच्या यशस्वी व्यापाचा व कार्याचा आजचा एकमेव प्रतिनिधि. लोकांना रिचर्डसन आपल्यातलाच वाटत असल्याचे स्पष्टपणे प्रथम भेटीतच मला दिसले. या रिचर्डसन विषयी बरेच समज—गैरसमज असल्याचे माझ्या ऐकण्यात आले होते. भारतीय लोकसत्तेतून अलग होण्याची कल्पना याचीच असून ती प्रवर्तित करण्याच्या दिशेने हा अजूनहि व्यस्त आणि व्यग्र आहे असेहि प्रवाद होते. अफवा अशीहि होती कीं या रिचर्डसनला भारतीय लोकसत्तेचे नेतृत्व अमान्य आहे. खरे काय ते काही दिवसात प्रत्यक्ष मला दिसणार होते. तरी त्याला प्रथम भेटल्यावर व त्यांच्याशी हस्तांदोलन करताना माझ्या मनातली ऐकीव माहिती चाळवली गेली......

—रिचर्डसन मला सांगत होते कीं, तुमची टीम निवडा. माझ्या स्वागताची फुटबॉलची ही मॅच आणि ती, चुरस उत्कंठापूर्ण, कमिश्नरांची व बिशपची टीम अशा विभागणीने होई. दोन्ही टीम्स् तयारीने खड्या होत्या. एका रंगातल्या खेळाडूंच्या कडे पाहून ही माझी टीम असा मी अंगुलीनिर्देश केला व रिचर्डसनने पुन्हा स्मित केले. हे स्मित मिस्किल होते. खट्याळहि वाटले. मात्र त्याचा अर्थबोध झाला नाही त्या वेळेस. पण पुढे जेव्हा मी माझी म्हणून निवडलेली टीम जिंकली तेव्हा त्याच्या स्मिताचा आशय त्यानेच स्पष्ट केला. मी जी टीम निवडली ती त्याच्या दृष्टीने कमकुवत होती आणि हरणारी टीम निवडली म्हणून ते स्मित झळकले होते. 'अगदी तुला धरून रिचर्डसन, माझी निवड चुकणार नाही असं या मॅचनेच सिद्ध केलं आहे'—असं रिचर्डसनला लगेच सांगावं असं मला क्षणभर वाटलं. परन्तु मीहि त्याच्या खुलाश्यावर नुसता हंसलो........सगळेच हंसले. उपचाराची घडी सैल होत होती. खेळामेळीचे वातावरण तेथील निसर्गातील निरोगीपणाशी संवादी बनत चालले......

## निकोबार—(मागे–पुढे) एक झलक

अंदमानला जाताना निकोबारला थांबायचं आणि पुढे जायचे या शिरस्त्याला अनुसरून आमचा कार्यक्रम सुरू झालाच होता. आमच्या कार्यक्रमाचा पुढचा भाग म्हणजे जेवण आणि निकोबारचा फेरफटका. निकोबारच्या खाण्याचा एक प्रकार जो विशेष वाटला तो म्हणजे चीज. जिभेला ज्या चीजची संवय झालेली ते हे नव्हे. हे चीज केवडीच्या फळाचं केलेलं असतं. करण्याची प्रक्रिया हीहि मोठी नोंद घेण्यासारखी, लक्षात ठेवण्यासारखी. केवडीचे फळ उकडून त्याचा कणकेप्रमाणे लगदा करून मग एका साध्या ४० नंबरी सुताचे धाग्याने त्यास पिंजावयाचे. ह्या धाग्याचे एक टोक पायाच्या अंगठ्यास बांधावयाचे व दुसरे डाव्या हाताच्या बोटीने उचलून धरावयाचे व उजव्या हाताने उपर्युक्त केवडीचा गोळा त्या धाग्याने पिंजून एकंदरीत या चीजची पाकसिद्धि व्हायची. हे चीज खावयास चांगलेच रुचिदिष्ट लागावयाचे.



'माझी पहिली सलामी'

निकोबार बेटे ही अंदमानच्या दक्षिणेकडे असून ती एकंदर संख्येने एकोणीस होत. पैकी सात बेटावरच वस्ती आहे. उरलेल्या बारावर नाही. उत्तरेकडील पहिले बेट 'कार निकोबार' १० अंश रेखांशाशी संलग्न असून दक्षिणेकडील 'ग्रेट निकोबार अर्थात चिपलोण' हे इंडोनेशियातील सुमात्रा बेटापासून ९० मैलावर आहे. आम्ही कार निकोबार बेटाचा जो फेरफटका मारत होतो तो एकूण बत्तीस मैलांचा होता. आमच्या ह्या भ्रमन्तीमध्ये पुढील वैशिष्टचे पटकन् लक्षात आली : सगळी माणसे कमरेखालचा थोडा भाग सोडला तर उघडी-नागडीच होती. त्यांची घरे घरासारखी वाटली नाहीत. निराळी होती. एकच एक घुमटासारखे जे असते ते त्यांचे घर. त्यात एक किंवा अनेक कुटुंम्बे राहतात. घरे तशी फार कमीच. अंथरूण पांघरूण नाही म्हटले तरी चालेल. अंथरावयास चटई. 'आकाश मंडप आणि पृथ्वी आसन' करून राहणारी ती निकोबारची माणसं असं वर्णन केल्यास ते अतिशयोक्तीचे होणार नाही.

## थोडे कूळ

मानव वंश शास्त्र दृष्ट्या निकोबारी आदिवासी 'पॉलिनेशीयन' गटाचे आहेत. हे येथील आदिवासी असले आणि बाहेरच्या संपर्क आणि प्रभावापासून अलिप्त आणि अश्राप राहिलेले असले तरी त्यांना मुळीच रानटी म्हणता येणार नाही. या प्रकारचे आदिवासी दक्षिणपूर्व आशियात पसरलेले असून त्यांची व्याप्ति फिजी, सामोआ आणि हवाई बेटास भिडते. टोलेमीच्या वर्णनाला अनुसरून निकोबारी या बेटावर दोन हजार वर्षापासून






तरी असावेत. या बेटांचा उल्लेख चिनी प्रवासी आटेंग याने इ. स. ६७२ मधे केला आहे. तांजोर येथील शिलालेखात (इ. स. १०५०) या 'वेटांना नक्कावरम्' (हा नग्नचा अपभ्रंश असावा) अर्थात नागड्या लोकांची भूमि असे संबोधले आहे. चोला राजघराण्यातील सम्राट राजेंद्र याच्या अधिसत्तेखाली हा प्रदेश काही दिवस होता. आणि त्याच्या आमदानीत बेटांना 'नक्कावरम्' असं नांव देण्यात आले. इ. स. १२९२ मधे मार्को पोलोने या बेटांचा 'नेकूवरम' असा उल्लेख केला आहे. फादर आडोनिकने इ. स. १३२२ मध्ये बेटांना 'निकोवरम' म्हटले आणि पोर्च्युगिज लोकांनी इ. स. १५२० मधे त्याचे 'नाकोवार' केले. याचेच पुढे 'निकोबार' झाले. निकोबार बेटावर एक चक्कर मारायच्या कार्यक्रमास आरंभ व्हायच्या सुमारास माझ्या मनात 'निकोबार' हा भाषिक अपभ्रंश कसा स्थिरावला याचा इतिहास उजळला आणि सहज एक दुसऱ्या अपभ्रंशाचे साम्य मनात चमकून गेले. विश्वकवि गु. रवीन्द्रनाथ टागोर या नांवातील 'टागोरा'चे असेच झाले. मूळ 'ठाकुर' नांव. 'ठाकुर'ला भारतीय व बंगाली जीवनात अर्थ व एक विशिष्ट संदर्भ आहे. परन्तु रवीन्द्रनाथ परदेशात फ्रान्समध्ये गेले आणि तेथील लोकांनी ठाकुरचे 'ठयाकुर, ठयाकेर, ठाकेर' करत करत शेवटी 'टागोर' झाले. नग्नावस्थेत असणाऱ्या निकोबाऱ्यांना 'नक्कावरम्' असं दिलेलं यथार्थ संबोधन जाऊन 'निकोबारी' असं नांवाचं 'वस्त्र' परिधान करावं लागल्यानं नव्या माणसाला त्याचा काहीच अर्थबोध होत नाही यात मुळीच आश्चर्य नाही कारण नक्कावरमचे निकोबार व्हावयास काही शतके लोटावी लागली आणि ठाकुरचे टागोर तर एक दोन तपात झाले !

## काही इतिहास

इ. स. १३२२ इसवीत फादर ओडेनिक याने निकोबार बेटावर पाऊल टाकले तेव्हा पासून खिश्चन मिशनऱ्यांनी केलेल्या कार्याची जी काही थोडीफार माहिती उपलब्ध आहे तिच्या आधारेच बेटाबद्दल काही कळते. बेटाचा तसा प्राचीन इतिहास, एवढा एक संदर्भ वगळल्यास, फारसा उपलब्ध नाही. जे काही कळते ते इतकेच की, या बेटावर चांचे आणि लुटारू यांचीच वस्ती होती आणि मध्ययुगीन काळातहि त्यांच्याशी संबंध मोठ्या कसोशीने टाळण्यात येत असे. परन्तु जी काही माहिती टंकलिखित किंवा लिखित आहे ती सर्व ऐकीव बातम्यांच्या आधारेच मुख्यत्वे ग्रथित करण्यात आली आहे. असंहि ऐकण्यात आलं कीं १८ व्या शतकाच्या पूर्वी त्या बेटावर वास्तव्य करून प्रत्यक्ष माहिती लिहिलेली आहे. ही माहिती माझ्या आढळात आली नाही. निकोबारी लोकाकडे पाहत असताना मनात नाना विचार येतात. एक भारतीय म्हणून अशी माणसे विशेष व बहुतेक पाहण्यात आलेली नसतात. बसक्या नाकाची, रंगाने पिवळसर काळी उघडी, ही माणसे पाहिल्यावर तुकतुकीत गव्हाळ, सावळ्या, (किंवा क्वचित गोऱ्या रंगाची) त्वचा, कांति, आभा, इ. इ. देखणेपणाच्या ठरीव कल्पना कोलमडून पडतात. माणसेच पण डोळ्यांना पाहण्याचा सराव नाही अशी. वास्तविक सर्व अवयव जिथे असावयास पाहिजेत तिथेच पण मनाला प्रथमदर्शनी लोभवत नाहीत. डोळ्यांना सुखवत नाहीत. निकोबार बेटावर आल्यापासून आणि फिरणे सुरू झाल्यापासून सारखा विचार येत होता कीं आचार, विचार, श्रद्धा, आणि भाषा ह्या बाबतीत सर्वस्वी भिन्न असलेल्या या माणसांच्या भावना आणि प्रेरणा, कामना आणि स्फूर्ति-स्थाने कोणती असावीत? यांच्या समाजधारणेच्या आणि मानवी नात्याच्या कल्पना काय असाव्यात? ज्यांच्या परंपरेचा आणि कार्याचा इतिहास नाही, ऊन, वारा आणि पाऊस यांचेच वदल ज्यांचे अनुभव व दैनंदिनीस घडवतात आणि नियंत्रित करतात त्यांचे जीवन असे काय असणार ?

## शोध

आम्ही जीपमध्ये निघालो होतो. कार निकोबारच्या जवळ जवळ सपाट परन्तु नारळीच्या झाडीने फुललेला भाग पाहत होतो. पण निरखत मात्र होतो माणसं. ज्या बेटाकरता मला शासनाची यंत्रणा राबवायची होती त्यात अंदमान नंतर कार निकोबार हे मुख्य बेट होतं. ही माणसं मला ओळखता आली तर पुढचं काम सुकर आणि सुलभ होणार होतं. शरीर वर्तमानात धावत होतं. मन मात्र इतिहास आणि भवती भोवती, मधून मधून दिसणाऱ्या माणसांचा वेध घेत होतं. काही तरी शोधत होतं. आलेल्या आणि गोळा केलेल्या अनुभवाच्या आणि आराखडयाच्या चौकटीत न बसणारी माणसे होती आणि अशा माणसांना आवडेल, विकासोन्मुख करता येईल असा आराखडा आणि चौकट संपन्न होऊ शकेल काय हाच एक प्रश्न सारखा धिरट्या घालत होता.


आनंदाने 'बेला' फुलला नृत्यांगणि अन् नाचुं लागला

निकोबारी लोक मुळात आशियातून देशांतर करीत या बेटावर आले आणि इतर कोणत्याहि जातिवंशाचा त्यांच्यावर परिणाम न होता ते या ठिकाणी वाढले. सर्व साधारणपणे हजारो



अनुक्रमणिका

वर्षे जगाशी या लोकांचा काही अंशी तरी संबंध आला असेल. परन्तु हा संबंध फारसा निकटचा आणि आदान प्रदानाचा नसावा. परिस्थितिशरण या माणसांचा स्वभाव निसर्गावरच्या परावलंबित्वाने घडवलेला आहे. अजूनहि कोणत्याहि नागरी संस्कृतीच्या संस्काराने तो जडवलेला नाही. कुणी खवचटपणे किंवा विनोदाने असेही म्हणतील कीं, तो अद्यापि विघडलेला किंवा विघडवलेला नाही.

अल्पवस्तीचे निकोबारी लोक जगतातच कसे? त्यांच्या घरांबद्दल उल्लेख आलेलाच आहे. त्यांचे अन्न म्हणजे नारळ, केळी, केवडीची फळे, मिळतील तेव्हां मासे व सणावारास डुक्कराचे मांस. समुद्राने वेष्टिलेल्या बेटाची हवा दमट आणि कोंदट खरीच पण बेटावरील पावसाच्या माऱ्याने आणि झाडीमुळे ओल आणि डास यांचा सुकाळ. थंडी अशी कधीच नाही. परंतु या विशिष्ट हवामानामुळे त्यांचा आयुष्यक्रम निराळा झाला आहे. या दृष्टीने त्यांना निशाचर म्हटल्यास ते वस्तुस्थितीला धरूनच होईल. या निशाचरीची परिणति आळशीपणात झाली आहे. दिवसा ऊन बरेच असते म्हणून त्यांची बरीच कामे, प्रवास, करमणुकीचे कार्यक्रम व इतर समारंभ हे रात्रीच्या वेळीच पार पाडले जातात. यातून दिवसा झोपण्याचा क्रम दैनंदिनीच्या अनुक्रमात चपखलपणे बसतो. स्वाभाविक ठरतो.



सुकान्त चन्द्रानना

## बोध

कार निकोबार बेटावरची ती पहिली चक्कर काही गोष्टी ठळकपणे माझ्या निदर्शनास आणत होती. पहिली त्यांच्या घराची. दुसरी त्यांच्या अन्नाची. तिसरी त्यांच्या अर्धनग्नतेची. चौथी त्यांच्या सामाजिक नात्याची. पांचवी त्यांच्या श्रद्धेची. एक गोष्ट उघडच दिसली कीं स्त्री-पुरुष भेद या लोकात फक्त निसर्गाने निर्माण केलेल्या फरकापर्यंतच मर्यादित आहेत. त्यांच्या घरात बैठकीची, स्वयंपाकाची, झोपायची अशी व्यवस्थाच नव्हती. शिजवणेच नव्हते तर स्वयंपाक कसला. उघडेच राहत असल्याने लपवण्यासारखे फारच थोडे होते. स्त्री-पुरुष संबंधहि निःसंकोच आणि समानतेच्या पातळीचे होते. आपल्यास अशिष्ट आणि किंवा असंमत वाटतील असे प्रकार दिवसा इतरांच्या उपस्थितीत आत्मरत होऊन चाललेले दिसल्यास आमच्या सारख्या, बाहेरच्या माणसास विचित्र आणि 'कससेच' वाटायचे पण तिथे त्याची कुणी वेगळी नोंदहि घ्यावयाचा नाही. नित्य नेमिक्रमाचाच तो आविष्कार आणि प्रकार असे गृहित होते. निसर्गपोषित आणि निसर्गावर पूर्णपणे अवलंबून असणारे जीवन असल्याने संचय नव्हता आणि संचय नव्हता म्हणून विषमता नाही. विषमता नाही तेव्हा संघर्ष, चौर्य आणि विद्रोह नाही. त्यांच्या सामाजिक नात्याला ही पार्श्वभूमि असल्याने 'वर्गविहिन समाज' असं वर्णन यथार्थ ठरेल. त्यांच्या श्रद्धेच्या बाबतीत ते ख्रिश्चन धर्माकडे कसे वळले याचा मानसशास्त्रीय तलास उद्बोधक ठरण्यासारखा आहे. जिथे जगणे निसर्गावर अवलंबून असते तिथे निसर्गाचे भय असते. निसर्गाची पूजा असते. आपल्या मकदूरीच्या आणि आवाक्याच्या बाहेर अशी एक प्रचंड शक्ति असून तिच्या हातातले आपण खेळणे आहोत अशी भावना एक प्रकारे मुक्त जीवन कंठणाऱ्या या लोकांच्या व्यक्तिमत्वात मूळ धरून बसते. यातूनच भूताखेतावर विश्वास, लोकभ्रम आणि अंधश्रद्धा येतात. स्थितिप्रियता येते म्हणून जो कुणी त्यांच्या या मनोभूमिकेची ही गोम ओळखतो त्याला त्यांच्या श्रद्धेचं रूपांतर किंवा स्थित्यंतर त्याच्यातल्या असाहाय्यतेच्या बीजाचे निराकरण करून साधता येते. ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या कार्याच्या विस्ताराचे क्षेत्र पाहिल्यास असे आढळून येते कीं निसर्गाच्या भीतीची आणि पूजेची जागा त्यांचा येशू आणि धर्म ही पाहता पाहता घेतात. दुसरे असे कीं, जिथे इतरांचे लक्ष नसते किंवा लक्ष जात नाही तिथे हे मिशनरी जातात. असहाय्य, दुबळे जन पाहून कळवळतात. दया दाखवतात आणि अभय देतात. शिक्षणाच्या सोयी उपलब्ध करून देतात आणि संस्कार करतात. पण त्या त्या लोकाशी समरस होऊन हे करतात.

## अप्रिय भूत ( काळ )

माझ्या मनात असा एक विचार आला कीं, निकोबारची एकूण परिस्थिति लक्षात घेतली तर इतर ठिकाणी जसे सरकार हवे असते तसे सरकार येथे खरोखरीच कितपत पूरक, उपकारक आणि उपयोगी ठरेल ? स्वातंत्र्य प्राप्तीपूर्वी म्हणजे १९४७ च्या पूर्वी येथील ब्रिटीश शासनाचे काम निकोबारमधील मूळ लोक व ब्रह्मदेश, मलाया, चीन व भारतीय व्यापारी यांच्यात शांतता राखण्याचे होते. ब्रिटीशांच्या काळात व्यापार वाढला व हे व्यापारी ब्रह्मी, मलायन, चिनी व भारतीय होते. हे बहुतेक लहान लहान व्यापारी होते व त्याना रंगून व मोलमेन येथील मोठ्या व्यापारी कंपन्याकडून भांडवल मिळत असे. १९२० पर्यंत

निकोबारमधील प्रत्येक खेड्यात या व्यापाऱ्यांचे दुकान उघडण्यात आलेले होते व काही खेड्यात आपसात स्पर्धा असलेली अनेक दुकाने होती. त्या वेळी रुपयाला १०० सुपाऱ्या या प्रमाणे किंमत आकारण्यात येत असली तरी निकोबारी माणसाला हिशोब करता येत नसल्यामुळे त्याच्याकडून जास्त पैसा घेण्यात येत असे. यामुळे निकोबारी माणूस कर्जबाजारी बनला व पहिल्या महायुद्धाच्या वेळी त्याचे कर्ज चार वर्षांच्या पिकांच्या उत्पन्नाइतके वाढले. ही त्यांची एक प्रकारे लुबाडणूकच होती. त्यावेळच्या चीफ कमिश्नराने याबाबतीत चौकशी करून एका हुकुमान्वये हे कर्ज माफ करवले. त्यानंतर व्यापाऱ्यांना परवाने देण्यात येऊन रोख पैशात व्यवहार करण्याचा हुकूम काढण्यात आला. परन्तु बाहेरच्या माणसांनी असा व्यवहार केल्याने सरळ निकोबारी लोकात असंतोष होता. बाहेरच्या माणसाबद्दल विश्वास नव्हता. मने, साशंक होती. निकोबारला हे आलेले अनाहूत व्यापारी निकोबारी स्त्रियांना रखेल्या म्हणून ठेवत व आपल्या देशात परत जाताना त्याना व त्यांच्यापासून झालेल्या मुलाबाळांना बेजबाबदारपणे सोडून जात. व्यापाऱ्यांचे हे वर्तन अगदी प्रथमपासून स्वार्थी आणि चीड आणणारे होते. चीफ कमिश्नरने पूर्वी माफ केलेले कर्ज वाटेल त्या मार्गाने वसूल करण्याचा मार्ग अवलंबण्यासहि त्यानी मागे पुढे पाहिले नाही. विशेषतः भारतीय व्यापारी दुसऱ्या युद्धाच्या काळात जपान्यांची मर्जी संपादन करण्याच्या हेतूने त्यांना मदत करू लागले. जपान्यांनी निकोबारी लोकावर अत्याचार केले आणि भारतीय व्यापाऱ्यांनी त्यांची साथ केली. साहजिकच निकोबारी लोक त्यांचा तिरस्कार करू लागले. जपान्यांच्या राजवटीतहि या व्यापाऱ्यांचा व्यापार चालेना व ते धुळीस मिळाले. त्यामुळे १९४५ मध्ये पुनर्रचित भारत शासन द्वारा त्याना परत पाठवण्यात आले. निकोबाऱ्यांनी मुक्तिदिन साजरा करावा अशीही घटना होती. त्यानी सुटकेचा निःश्वास सोडला. युद्धामुळे जर कोणता फायदा झाला असेल तर तो हा होय असं तेथील जाणत्या लोकांचे एकंदरीत मत होते. तरी बाहेरून येणाऱ्या विषयी अनुकूल ग्रह नव्हता. यामुळेच (म्हणजे बाहेरच्या व्यापाऱ्यांनी केलेल्या लुबाडणुकीमुळे ) १९ जुले १९४७ रोजी त्यावेळचे कॅनन (आता बिशप) जॉन रिचर्डसन व इतर सहा जणांनी चीफ कमिश्नरकडे एक असा अर्ज केला कीं ब्रिटीश सरकारनें त्याना स्वातंत्र्य द्यावे. 'निकोबारी लोकांचे व भारतीय व्यापाऱ्यांचे संबंध सलोख्याचे नाहीत व त्याना भारतीय मालक नको आहेत' असा शेरा तत्समयीन डेप्युटी कमिश्नरने या अर्जावर मारला होता.

—अशा निकोबारी लोकात मी फिरत होतो. त्याच बिशप रिचर्डसनने माझे सस्मित स्वागत केले होते. ह्या सुरुवातीचा शेवट कसा होईल? हा एकच महत्वाचा प्रश्न माझ्या मनात पिंगा घालत होता.



"या, या, कोणी का असेना, या आंत !"

## समज - समजणे

निकोबारी लोकांचा भारतीय माणसांचा तिरस्कार हा इलाजापलीकडचा रोग नव्हता. किंबहुना १९४६ नंतर भारताशी अधिक संबंध आल्यामुळे ही परिस्थिति मी पाऊल ठेवण्याच्या सुमारास काही अंशी निवळली होती तरी ती माणसं पूर्णपणे आत्मसात् झाली नव्हती. माझ्यापुढे समस्या होती ती त्यांना भारतीय जीवनाशी एकात्म करण्याची. प्रजासत्ताक भारताचे संविधान माणसाच्या विकासाला आवश्यक असणाऱ्या मूलभूत स्वातंत्र्याचे अभिवचन देणारे आहे. लोकशाहीचा आम्ही स्वीकार केला आहे. आदर्श समाजव्यवस्था आणि आदर्श मानव निर्माण करण्याचा हा प्रयोग आणि प्रयत्न आहे आणि सध्या तरी याच्यापेक्षा सरस पर्याय नाही. कार निकोबारचा प्रदेश जीपखालून आणि आमच्या नजरेखालून झरझर चालला होता. माती व वनश्री पाहत होतो. माणसे पाहत होतो. त्यांच्या प्रतिनिधींशीं बोलतो आणि बोलत होतो. कां, कुणास ठाऊक, सर्वतोपरी भिन्न प्रदेश आणि माणसे असूनहि वाटत होतं कीं हे साशंकतेचं वातावरण फार काळ टिकणार नाही. कदाचित् असंहि असेल कीं तेथे नियुक्त झालेल्या पहिल्या भारतीय कमिश्नरनी जे सहकारी चळवळीचे बीज रोवले ते अंकुरित झाले होते आणि सर्वांगाने पल्लवित व कुसुमित होण्याची वेळ फार दूर नव्हती. माझ्या असं कानावर आलं कीं, प्राथमिक सहकारी संस्थांची तेथे चांगली भरभराट झाली होती आणि लोकांच्या पातळीवरील सर्व

व्यापार करणाऱ्या कंपनीच्या मध्यवर्ती भागीदारीचे ५० टक्के शेअर्स लोकांनी खरेदी केले होते.

निकोबारी प्रदेशातून फेरफटका मारताना सहज मनात आले कीं, विपुल भूप्रदेश आणि विरळ लोकवस्ती, उंच उंच वृक्षराशी आणि अन्य वनस्पति यांच्या पोटात आणि अस्तित्वाखाली नक्कीच खनिज संपत्ति असावी. जमिनीवर आणि खाली जी नैसर्गिक क्षमता आहे तिचा योग्य वापर समृद्धीला पुरक ठरेल. ज्या पंचवर्षीय विकास योजना आहेत त्यांचा या अनुषंगाने बराच लाभ करून घेता येईल.

निकोबारी माणसांचं कोडं होतं मला. काय भावभावना असतील यांच्या? आमच्या सौंदर्याच्या आणि सुरेखपणाच्या कोणत्याच व्याख्येत ती माणसं बसण्यासारखी नव्हती. त्यांच्यात कला प्रेम आणि संगीत प्रेम नव्हते! त्याना नाचाचे आणि गाण्याचे अंग होते. ते सांघिक होते व त्यात संगीताचाहि अभाव होता. आम्हाला अपरिचित होते. नवे होते. शरीर आणि मन गतीने व भावनेने झेपावून क्रीडेचा आणि मनोरंजनाचा आविष्कार होता. कलेच्या वावतीत कुणीतरी लिहलेलं (Herbert Read) आठवलं,

> 'Art is in some sense a liberation of the Personality, normally our feelings are inhibited and repressed. We contemplate a work of Art, and immediately there is a release; and not only a release — sympathy is a release of feelings — but also an heightening, a tautering, a sublimation.'

आपण हे मुळात लक्षात घेत नाही आणि एका विशिष्ट संदर्भात आणि मर्यादित अर्थानेच कलाविष्कार गृहित धरतो. याच भावनेनं माझ्या उत्साहाला कार्यप्रवण ठेवलं आणि प्रजासत्ताक दिनी निकोबारी लोकांचं नृत्य राजधानीत झालं. दिल्लीश्वरांनी त्याचं कौतुक केलं.

ज्या अंदमानचा प्रशासक म्हणून मी प्रस्थान ठेवलं होतं आणि वाटेवर थांबून कार निकोबारचं दर्शन घेत होतो ते निकोबार अंदमानपेक्षा पूर्णपणे वेगळं होतं. चिक्कार पावसामुळे निकोबारला वरचेवर येणं शक्य नव्हतं. कारण बोटी जरी वर्षभर चालतात तरी कार निकोबार सोडून ह्या द्वीपवृंदास भेट देत नाहीत. लहान्या बोटी केवळ ४|६ महिनेच चालत. म्हणून पुन्हा सविस्तर येऊन पाहू आणि त्याचा आताच कशाला विचार असा धोतरझटकेपणा मला रूचणारा नव्हता. एव्हाना माझ्या मनावर Avcmineच्या गुंगीचा अमल गेला होता आणि पाहिलेलं व पाहत असलेलं निकोबार फेर धरून होतं. आत ओढून घेत होतं आणि माझ्या अंतरात शिरत होतं.

अशा प्रक्रिया चालू असताना मला एका प्रश्नाने घेरलं. ही माणसं भारताला आपली करायची आहेत. ती करता येणं फारसं कठिण नाही. भारताला आपला मानतीलहि पण स्वतः तशा अर्थाने भारतीय बनतील?—मी रिचर्डसनकडे एक कटाक्ष टाकला. त्याला काय कल्पना कीं, माझ्या मनात काय चालले आहे? परंतु एक मात्र दिसले कीं रिचर्डसनला बरं वाटलं होतं. त्याचं आताचं स्मित सुरूवातीच्या स्वागताच्या स्मितासारखं नव्हतं. त्यात स्वागताबरोबरच स्वीकारहि असावा असा मला भास झाला आणि हा भास, भास राहिला नाही. रिचर्डसन एकटाच असा होता कीं, निकोबारी ओळखत होता आणि निकोबाऱ्यांच्या दृष्टीने भारतीयांना ओळखून होता. पहिली फेर तर ठीक झाली असं माझ्या मनास जाणवलं त्याचं कारण या रिचर्डसनच्या सहाय्याने आणि मध्यस्थीने भारत निकोबारचं परस्परावलंबित्व, परस्पर पूरकत्व ठरायचं होतं.

[क्रमशः]

"सांच्याला नगं. आत्ताच्या आत्ता माज्या नजरे-म्होरनं हलवा तिला" सलिमा तीव्र स्वरात म्हणाली. विश्वासराव कल्याणीला घेऊन निघाले. कल्याणीने तोंड फिरवताच सलिमाच्या नरड्यात हुंदका दाटला....कां ?




—रा. रं. बोराडे

**अंगणात** गलका झाला तशी सलीमा बाहेर आली. तहानल्यावनी तिनं समोर नजर टाकली. आठ दहा वर्षांच्या आसपास वय असलेली तीन मुलं वाड्यात शिरली होती. त्यांच्यापैकी एकजण चिंध्याचा चेंडू टेचाळीत होता. आणि बाकीची दोघं तो चेंडू पकडण्याचा प्रयत्न करीत होती. त्यांच्या एकंदर हालचालीवरून त्यांना भोवतालच्या स्थितीचं भान असावं असं वाटत नव्हतं. त्यांची नजर त्या चेंडूवर खिळली होती व चेंडू बरोबरच धावत होती. सलीमाची नजर त्या मुलांवर खिळली. ती टक लावून त्यांच्या हालचाली टिपून घेऊ लागली. चेंडू उशी घेत तिच्याजवळ आला व तिच्या पायात घोटाळला. तिनं मुलांची गंमत करायचं ठरविलं. त्याना काही वेळ खेळवायचं ठरविलं. ती पटक् खाली वाकली व हातात चेंडू घेऊन ती हसत उभी राहिली. तिच्या हातात चेंडू जाताच मुलं एकदम भानावर आली. दचकल्यावनी त्यानी सलीमाकडं पाहिलं. आणि म्यालेल्या पाडसावनी त्यांचे चेहरे झाले. चेंडू तिच्या हातात ठेवून ती ताबडतोब तिथून पसार झाली. सलीमा एकदम भानावर आली. तिच्या नजरेतलं कौतुक ओसरलं. व चेहऱ्यावर परत उदासीनता पसरली. एक खोल उसासा सोडीत तिनं मुलांच्या दिशेने चेंडू भिरकावला व मेढीचा आधार घेऊन ती उभी राहिली. इतक्यात घोड्याच्या टापा वाजल्या. घोडं वेगानं आल्यावनी व तिच्या दारात थांबल्यावनी वाटलं. तिचा चेहरा आकसला. दाराकडं नजर लावून ती पाहत राहिली. प्रथम विश्वासरावांची आकृति दारात उमटली व त्यांच्या पाठोपाठ एक करड्या रंगाची घोडी आली. ती पुन्हा पुन्हा फुरफुरत होती व कान टवकारीत होती. अंगणात आल्यानंतर त्यांनी हसून सलीमाकडं पाहिलं व घोडीच्या पाठीवर थाप मारीत सलीमाला म्हणाले–

"सलमा, हिकडं ये."

त्यांच्या प्रेमळ आवाजातहि जरब होती. सलीमा चार पावलं पुढं सरकली व विश्वासरावांच्य ासमोर उभी राहिली. त्यांनी एकवार सलीमाला पायापासून डोळ्यापर्यंत न्याहाळलं. एकवार घोडीकडं पाहिलं व मिशाचे आंकडे पिळीत त्यांनी तिला विचारले,

"सलमा, कसी काय वाटते क्कल्याणी? "





अनुक्रमणिका

घोडीचं नांव कल्याणी होतं तर! सलीमाला घोड्यातले बारकावे समजत नव्हते. तरीहि तिनं कल्याणीला न्याहाळलं. जनावर उमदं होतं. विश्वासराव उंच होते; पण तेहि तिच्या पोटाला लागत होते. तिचा रंग करडा होता. थोडीशी जरी कसली चाहूल लागली तरी ती कान टवकारीत होती व पाय आपटीत फुरफुरत होती. तिचा पृष्ठभाग भरत होता व एकंदर शरीराला गोलाई चढत होती. सलीमानं हे सारं पाहून घेतलं व काही तरी बोलायला हवं म्हणून ती म्हणाली–

"चांगलीच तर हाय!"

पण तेवढ्यावरहि विश्वासरावांचं समाधान झालं नाही. कल्याणीच्या मानेवर थोपटीत ते म्हणाले,

"निसतं चांगलीच म्हनु नकु, मस्त हाय म्हन."

त्यांच्या खुषीवर पाणी फिरवायला नको म्हणून ती म्हणाली–

"बरं मस्त हाय."

"केऱ्हडयाला आनली आसंल वाटतं?"

"मला काय कळतंय त्यांतलं."

"नगदी सोळाशे रुपये मोजलेत."

तिनं नवलाईनं विचारलं.

"हितके रुपये?"

"मंग तुला किती वाटले? किती उमदं जनावर हाय. पळाया लागली तर पानी हालत न्हाई पोटातलं–"

ती काही बोलली नाही. इतक्यात विश्वासरावांना काहीतरी आठवलं. ते सलीमाला म्हणाले,

"आगं नवं जनावर आलंय घरात. पूजा कर त्येची."

तिला सारं माहीत असूनहि तिनं विचारलं–

"कशी करायची असते पूजा?"

"तिच्या उजव्या पायावर पाणी टाकायचं आन् कुंकू लावायचं."

ती या वाड्यात आली तेव्हा विश्वासरावांनी तिला असंच कुंकू लावावयास सांगितलं होतं. पण तिनं ताबडतोब नकार दिला होता. ते आपल्याशी लग्न लावावयास तयार असतील तरच आपण कुंकू लावू असं तिनं सांगितलं होतं. विश्वासरावांनी तिच्याशी लग्न केलं नव्हतं आणि म्हणूनच तिनंही कधी कुंकू लावलं नव्हतं. कल्याणीला कुंकू लावण्याच्या निमित्तानं तिला हे सारं आठवलं. विश्वासरावांना काही तरी कट बोलावं असं तिला वाटलं; पण ती एवढंच म्हणाली–

"म्या सोताय कुंकू लावीत न्हाई तर तिला तरी कुठलं लावू?"

"बरं, पायावर पानी तरी सोड तिच्या."

तिनं घरातून पाणी आणलं. कल्याणीच्या उजव्या पायावर सोडलं. नंतर तिनं बोटातली आंगठी काढली. कल्याणीच्या कपाळाला लावली. आपल्या कपाळाला लावली व परत बोटात घातली. विश्वासरावांना बरं वाटलं. सलीमाकडं पाहत ते हसले. सलीमाहि हसली. खुषीत येऊन म्हणाली–

"घोडीच्या ऐवजी घोडं का आनलं न्हाई."

"मुद्दामच आनलं न्हाई."

"का?"

"घोड्याची जात लई लवकर माजते. कितीबी आवरायचं म्हनलं तरी मग आवरत न्हाई."

"आन् ही बया माजायची न्हाई कश्यावरनं?"

"घोड्याइतकी माजत नसते."

"तरी पर माजलंच की."

"ती माजली तरी काभी व्हत न्हाभी, जरा वळवळ कराया लागली की नथनी अडकावून टाकायची. मंग तिच्या जल्माचीच निचिती हून जाते."

धक्का बसल्यावनी तिनं विचारलं,

"म्हंजी तिला तुमी नथनी घालनार हाव का?"

"मंग त्यासिवा तिची उमेद कशी टिकंल तर...."

विश्वासराव सांगत होते आणि सलीमा ऐकत होती. कल्याणीवनीच तीहि एके दिवशी या वाड्यात आली होती. विश्वासरावासाठी आई–बापाना दूर लोटलं होतं. व पाण्याची एखादी लाट यावी तशी ती विश्वासरावाकडं आली होती. पण अशावेळी एकदम थप्पड मारल्यावनी विश्वासरावानं तिला केलं होतं. तिची जवानी कायम राहावी म्हणून तिची 'आप्रेशन' करावयाची कल्पना बोलून दाखविली होती. ती असं काही करावयास तयार असेल तरच आपण तिचा स्वीकार करू असं सूचकपणे बजाविलं होतं. सलीमाला विलक्षण संताप आला होता. पण ती आता काहीच करू शकत नव्हती. पाण्याची लाट किनाऱ्याकडं आली होती. किनारा तटस्थ होता. पण तिला वाऱ्यानं वेग दिला होता. तिला आता परत फिरणं शक्य नव्हतं. मग तिनं ओठावर ओठ दाबला होता आणि डोळे मिटून ती विश्वासरावांच्या जीवनात कोसळली होती......

ती काही बोलत नाही असं पाहून विश्वासरावानी विचारलं,

"का ग, कसला इचार करतीस?"

विश्वासरावाना खूप बोलावं; तुम्हाला जीवनात रंग उडवायचा असतो. तेवढ्याचसाठी तुम्ही एखाद्याला जवळ करता, दुसऱ्याच्या भावनेची कदर न करता लुटता येईल तेवढा रंग लुटता. एवढ्याचसाठी दहा वर्षापूर्वी तुम्ही मला आणलं होतं. व आज कल्याणीलाहि तेवढ्याचसाठी या वाड्यात आणलं आहे असं तिला सांगावं, मनात दाटलेल्या संतापाला वाचा फोडावी असं तिला वाटलं, पण ती एवढंच म्हणाली,

"कसलाच न्हाई."

आणि तोंड फिरवून ती घरात आली.

रात्री विश्वासरावांच्या बाहूत विसावल्यावर तिनं विचारलं–

"खरं का तुमी कल्याणीला नथनी घालनार हाव?"

तिचा गालगुच्चा घेत विश्वासराव म्हणाले.

"म्या कंवा खोटं सांगितलं का तुला?"

सलीमा अधिकच बिलगत त्याना म्हणाली,

"माजं एक आयकिताव का?"

"एक सोडून हजार सांग की"

"हजार नग. एव्हडं एकच आयका."

"बरं सांग."

"आयकिनार असलाव तर सांगते."

विश्वासराव हसत म्हणाले–

"कान हायीत तंवा आयकावंच लागंल न्हवं का."












"चेस्टा करू नका. खरं खरं सांगा"

"बरं सांग."

"कल्याणीला नयनी घालू नका"

विश्वासरावानी कपाळावर आट्या चढवीत विचारले–

"का ?"

"ती फसवलेली बगायचीय मला."

"काय तरीच सांगतीस तूं. आगं एकदा ती फसवली तर ती कायमची कामातनं जाईल. एक मईलभर सुदा पळायची तिला उमेद न्हायची न्हाओी."

"काय बी हूवा पर तिला नयनी घालू नका"

"येडीच हायीस तूं."

"मला येडी म्हना. आगर काओी म्हना पर एव्हडं आयका माजं."

यावेळी तरी तिला नाराज करणं बरं नाही हे लक्षात घेऊन ते म्हणाले,

"बरं बगू."

विश्वासराव असं म्हणाले तेंव्हा तिला समाधान वाटलं.

त्या दिवसापासून ती कल्याणीची काळजी घेऊ लागली तिला नजरेनं न्याहाळू लागली. तिला वेळच्यावेळी वैरणकाडी करू लागली. पसाभर चंदी अधिक देऊ लागली. पाहता पाहता कल्याणीनं तेज धरलं. तिच्या पृष्ठ भागाला गोलाई चढली. ती खाता खाता मध्येच फुरफुरू लागली. पायबंदाला झटके देऊ लागली. एके दिवशी तर ती तबेल्यात गोंधळच घालू लागली. तांबडं फुटण्याचा सुमार असावा. तबेल्यात सारखा आवाज होऊ लागला. धाड धाड वाजू लागलं. विश्वासराव वाड्यात नव्हते. निम्मी रात्र सलीमाच्या सहवासात घालवून ते आपल्या दुसऱ्या वाड्यात गेले होते. सलीमानं पदराखाली दिवा घेतला व तबेल्याच्या तोंडाशी आली. दिव्याच्या प्रकाशांत तिनं कल्याणीकडं पाहिलं. कल्याणी फुरफुरत होती. ओठ फेंदारून ती कसला तरी वास घेत होती. अधून मधून ती मागचे दोन्ही पाय वर उचलून लाथा झाडल्यावनी करीत होती. तिच्या या हालचालीत थोडा देखील खंड नव्हता. सलीमा काही वेळ तिच्या या हालचाली पाहत राहिली. मध्येच तिनं मनाशी कसला तरी एक निश्चित विचार केला. हातातला दिवा तिनं बाजूला ठेवला. व ती कल्याणीच्या जवळ गेली. तिच्या गळ्यातलं दावं तिनं काढून घेतलं कल्याणी एक वेळ फुरफुरली. स्वत:भोवती तिनं एक गिरकी घेतली व ताबडतोब ती वाड्यातून बाहेर पळाली. सलीमाचं मन आनंदानं भरून आलं. वाड्यातून बाहेर पडत असलेल्या कल्याणीकडं पाहात असतानाच तिच्या डोळ्यात पाणी खळखळलं. . . .

न्याहारीच्या वेळंला विश्वासराव वाड्यात आले. ते वाड्यात एकटेच येतील, तबेल्यात कल्याणी नाही असं दिसताच तिची सलीमाजवळ चौकशी करतील व ती पळून गेली असं आपण सांगताच ते पळापळ करतील, कल्याणीला पकडण्यासाठी धावतील असं तिला वाटत होतं. पण ते वाड्यात आले तेंव्हा ते एकटेच नव्हते तर त्यांच्या बरोबर कल्याणीहि होती. सलीमानं तिच्याकडं बारकाईनं पाहिलं. तिच्या डोळ्यात तृप्तीच्या ऐवजी वेदना दिसत होती. तिच्या हालचालीहि थंडावल्यावनी वाटत होत्या. सलीमाला उत्सुकता लागली. काय प्रकार झाला हे जाणून घ्यावं असं तिला वाटू लागलं. कल्याणी वाड्यात येताच ती पुढं झाली व विश्वासरावाना तिनं विचारलं,

"कुटं गवसली ?"

"इमामभाओीच्या घोड्याच्या तबेल्यात शिरली व्हती. इमामभाईचं घोडं गच्च बांधलं व्हतं. म्हणून बरं न्हाई तर समदाच घोटाळा झाला असता."

सारं काही लक्षात येऊनहि तिनं खात्री करून घेण्यासाठी विचारलं–

"कसला घोटाळा ?"

"आगं वास घेत ती इमामभाओीच्या घोड्याकडं गेली होती. पर वाड्यातल्या मानसानी तिला बगीतले. आन् लगूलग मला वर्दी दिली. इमामभाओीचं घोडं सुटायच्या आतच म्या तिला [illegible]रलं."








ती काहीशी नाराज झाली. असं व्हावयास नको होतं असं तिला वाटलं. पण तिनं पुन्हा मनाची समजूत घातली. आज ती पकडली गेली असली तरी हर-कत नाही. इमामभाओीच्या घोड्याचा तिला ठावठिकाणा माहीत झालेला आहे. आज शक्य झालं नसलं तरी उद्या शक्य होईल, उद्या शक्य झालं नाही तरी परवा होईल. सलीमा मनाशी असा विचार करीत असतानाच विश्वासरावांनी विचारलं––

"कसी निसटली ग ?"

"मला तर काहीच ठावं झालं न्हाओी. सकाळा उटून बगते तर ही बया तबेल्यात न्हाओी. पायबंदाचे दावे सुटलेले आन् गळ्याचं दावं तिनं न्हेलेलं. आता जरा गच्च बांधीत चला."

"आतां बाओी तीची एन्हडी फिकीर करायचं कारन न्हाओी."

तिच्या काहीच लक्षात न आल्यामुळं तिनं विचारलं––

"म्हंजी ?"

"नयनी अडकावून टाकलीय तिला"

तिला एकदम धक्का बसला. ती संता-पानं पेटून निघाली. तिचे ओठ थरथरू लागले व नाकपुड्या फुलू लागल्या.

"म्हंजी तुमी शेवटाला आपल्या मना-सारखं केलंच म्हना की ?"

"मंग काय करू तर !"

"नसती नयनी घातलाव तर लई बिघडलं असतं की ?"

विश्वासरावानाहि तिचा राग आला. धार चढलेल्या आवाजात ते तिला म्हणाले,

"तिच्या नथनीहून तुला काय करायचंय."

"मंग तिला तिकडल्या वाड्यात धिऊन जावा. तिकडं तुमच्या लेकरावांयी माय हाय. तिकडंच ठेवा तिला."

"आन् मला तिला हितंच ठिवायचं आसंल तर."

"मंग म्या हितं न्हायची न्हाओी."



"कुटं जायील ?"

"जिकडं वाट जाओील तिकडं जाईन".

तिचा असा निश्चय पाहून विश्वास-रावहि चकित झाले. काही वेळ विचार करून ते नंतर म्हणाले–

"बरं, सांच्याला न्हेतो."

"सांच्याला नग, आग घटकाभर नग. आताच्या आता माज्या नजरेम्होरनं हलवा तिला."

एक उसासा सोडीत विश्वासराव म्हणाले,

"बरं, तुज्या मनासारखं का हुईना."

एवढं बोलून विश्वासरावानी तोंड फिरविलं व कल्याणीला घेऊन ते निघाले. कल्याणीनंहि तोंड फिरविलं. तिनं तोंड फिरविताच सलीमाच्या नरड्यात हुंदका दाटला. तिनं डोळे गच्च मिटले व ओठा-वर ओठ दाबून ती उभी राहिली. . . .

• • •




अनुक्रमणिका

# कशी रे तुला भेटूं?

—रंगनाथ कुलकर्णी

**आज** शरद् पौर्णिमा आहे . . .

समोरच्या क्षितिजावर डौलानं अधिराज्य गाजवणाऱ्या या पूर्ण-चंद्रानं माझ्या मानससागराला कसली तरी अगम्य ओढ लावली आहे . . . .

ही ओढ कसली आहे ?

कशाची बरं एवढी आंस लागली असेल माझ्या अंत:करणाला ?

माझ्या लाडक्या राजाला भेटण्याची तर ही ओढ नसेल ? . . . माझ्या हृदयातल्या तुझ्या मूर्तीनं आज एकाएकी ही अशी आर्त हांक कां बरं दिली असावी ?

बरोबर बारा वर्षं होऊन गेली. एक तप उलटलं. आपली ती शेवटची भेट झाली. त्या दिवशी अशीच पौर्णिमा होती. समुद्राच्या कांठावर फरसबंदी बाकावर आपण बसलो होतो. मूकपणानं.

तुझ्या मनात कोणते विचार असतील ते मला सांगता येणार नाही. पण माझ्या मनात मात्र विचारांचं वादळ थैमान घालीत होतं. कारण . . . कारण . . . मी एक निश्चय करून चुकले होते.

माझ्या दृष्टीनं ती आपली शेवटची भेट ठरणार होती...

"कां गप्पशी ?" तूं सहज विचारलंस.

"कुठे ? काही नाही"—मनातले भाव लपवीत मी किंचित् हंसून म्हटलं.

"मनात एक अन् ओठावर भलतंच हाच तर तुम्हा स्त्रियांचा स्वभावविशेष नाही ना ?"

तुझ्या सुरात राग अधिक होता की, खेद अधिक. ते मला-देखील सांगता आलं नसतं.

तुझ्या त्या बोचक सवालानं एक काम मात्र बेमालूम केलं. माझ्या मनाचा तोल मला झट्दिशी सांवरता आला. भावनांचा पेला कांठोकांठ भरलेला असताना आपल्या जिवलगानं तशाच भावनावेगानं त्याला लहानसा धक्का दिला तर आमचे भावाश्रु नयनांच्या कोंदणातून सर्रकन् ओघळून जातात. पण विद्रोही



अनुक्रमणिका

आज मी तुला आपण होऊन भेटायला आले तर पूर्वीच्याच आत्मिक ओढीने तूं मला सामोरा येशील? पूर्वीच्याच एकतानतेने आपल्या हृदयवीणा तो षड्ज साधतील? सांग ना! दे ना या प्रश्नांची उत्तरे!

तुफानाच्या विषारी हल्ल्याला तोंड देताना मात्र त्याच नयन-कुंडातून ज्वलंत स्फुल्लिंग बाहेर फेकले जातात...

तसंच काहीसं झालं त्यावेळी.

अचानक मला भांडणाचं स्फुरण आलं.

"मुखात राम अन् बगलेत सुरी—अशी वृत्ति तुम्हा पुरुषांचीच असते म्हटलं!"

माझ्या तोंडून सुटलेल्या बाणानं तुझ्या अंतःकरणाला चांगलीच जखम केली असावी. कारण त्यानंतर तूं कितीतरी वेळ गप्प बसलास. समोरच्या सागर लहरींचं मंद नृत्य पहात बसलेली तुझी ती निश्चल मूर्ति आजदेखील माझ्या अंतश्चक्षूंना स्पष्ट दिसते आहे रे.

एकीकडे असं वाटत होतं, असं गप्प बसण्यापेक्षा हा काहीतरी ताडताड बोलून टाकील तर बरं. दुसरीकडे, अहंकाराचे नाग आपली विषारी फडा काढून जोरजोरानं फुत्कार सोडीत होते—'त्यानं कां असं बोलावं? तूं काही प्रथम वाईट बोलली नव्हतीस. तूं फक्त योग्य तेच उत्तर दिलंस. त्यानं गप्प बसून भागणार नाही. त्यानं तुझी माफी मागायला हवी...त्रिवार माफी!!!'

"जाऊं या—चल—"

तूं कोरड्या सुरात म्हणालास.

"हूं!" म्हणून मी उठले. उगीचच कपडे झटकल्यासारखं केलं.

आपण अगदी जवळून चाललो होतो—शरीरानं. पण आपण कोकडो कोस दूर गेलो होतो—मनानं.

एक मन आकांत करून सांगत होतं—'तो कलावंत आहे. त्याचं मन मेणासारखं मऊ आहे. तूं कां निष्कारण त्या कोमल अंतःकरणावर प्रहार केलास? त्यानं असा तुझा काय अपराध केला होता?.....जा...जा..हो पुढं. आज जे काम एखाद्या शब्दानं, एखाद्या हंसऱ्या कटाक्षानं होऊन जाईल ते उद्या सहस्रावधि शब्दांच्या निर्जीव संभारानं देखील होणार नाही.'

'पण कां?'—दुसरं मन तितक्याच खंबीरपणे विचारीत होतं—'तो तेवढा कलावंत आहे, अन् तूं नाहीस का? त्याचं मन तेवढं मेणासारखं मऊ, अन् तुझं मन म्हणजे काय लोहाराची ऐरण आहे? त्यानं कां प्रथम प्रहार करावा?—क्षमायाचना करायची असेल तर ती त्यानंच करायला हवी...'

त्या दिवशी माझा साधा निरोप देखील न घेता तूं गेलास. काही झालं तरी दुसऱ्या दिवशी तूं येशील असं वाटलं होतं मला. पण तूं आला नाहीस...दुसऱ्या दिवशी नाही, तिसऱ्या दिवशी नाही अन् पुन्हा कधीच नाही....

बरोबर एक तप उलटून गेलंय. तरी त्या पौर्णिमेच्या दिवशी आपल्या भेटीत घडलेल्या बारीक—सारीक गोष्टींचा तपशील मला पुरेपूर आठवतो...

जीवन प्रवासात माणूस एखाद्या केळी अशा तिठ्यावर येऊन ठेपतो की, त्या क्षणीच जर त्यानं योग्य निर्णय घेतला नाही तर तो कुठल्या कुठं जातो.....

त्या क्षणापर्यंत एकमेकांची साथ करणारे जीव क्षणार्धाची चूकभूल देखील चालवून न घेतां 'यथा काष्ठंच काष्ठंच' या न्यायानं एकमेकांपासून दूर दूर जातात...

मार्ग बदलला, साथ सुटली की, पुढचा सारा जीवनौघ बदलून जातो. कुणाला ही ताटातूट उपकारक ठरते, तर कुणाला ती जन्मभर दुःखात तळमळत ठेवायला कारणीभूत होते.

आपलंहि तसंच झालं.

त्या दिवसापासूनच जणुं काही तुझ्या भाग्यचक्रानं विलक्षण गति घेतली अन् माझं साधं जीवनचक्र देखील कर्णाच्या रथासारखं खोल खोल रुतू लागलं...

रोज रोज तूं मोठा होत होतास— शुक्लपक्षांतल्या चंद्राप्रमाणे तुझं तेज अधिकाधिक अफाट क्षेत्रं उजळून काढीत होतं. तुझ्या मुलायम कंठातनं निघणारा सुरेल स्वर सहस्रावधींचे कर्ण तृप्त करीत होता, तर सप्तरंगांना मन मानेल तसं वाकायला लावणारा तुझा रंगेल कुंचला देशीविदेशी जाणकारांना मुग्धचकित करीत होता...

माझ्या मनाची मग मी समजूत काढीत असे. आपण मुद्दामच ही ताटातूट घडवून आणली. भंगलेल्या हृदयातून स्वरसम्राट तानसेनानं जगाला स्वर लहरींचा आगळाच साज सादर केला. माझ्या लाडक्या राजाच्याहि कंठातून असेच अभूतपूर्व, अश्रुतपूर्व सूर निघू देत की, लोक म्हणतील—"वाहवा! आहे खरा सवाई तानसेन!"

एक दिवस नाही, दोन दिवस नाही—असं मी आज सतत बारा वर्षं माझ्या मनाला बजावीत आहे. माझं आत्मसमर्पण वाया गेलं नाही. माझ्या देवावरनं जरी मला या शरीरकुडीचं फूल ओवाळून टाकण्याचं भाग्य लाभलं नसलं, तरी आज निर्माल्यवत् झालेल्या या फुलानं आपलं जीवितकार्य नेमकं केलेलं आहे. हे फूल आहे की, हा कांटा?—असा संभ्रम निर्माण करणारा तो महान् क्षण मी कधी तरी विसरू शकेन का?

लौकिक अर्थानं आज मला काहीही कमी नाही. मी नंतर एका बड्या व्यापाऱ्याशी लग्न केलं. माझ्यासारखी गुणी, कलावंत पत्नी लाभली म्हणून तो माझा शतजन्माचा गुलाम होऊन बसला आहे...दोन चिमण्या जीवांची भर आमच्या या सुखी संसारात चंद्राची शीतलता, नपुरांचा झंकार अन् द्राक्षांची माधुरी पसरीत आहे...सारं काही जिथल्या तिथं आहे.

पण मी सुखी आहे का?

अशा या सुखानं भरलेल्या संसारात सर्वस्वी रममाण झालेल्या मला आज तुझी कां बरं आठवण यावी? आली तरी इतक्या तीव्रतेनं कां यावी? इतकी ओढ चांगली का?

पण माझ्या मनाला बोंचतेय् ती खरी खंत ही नाही. माझा जिवलग दोस्त कलाकार आज कुठच्या कुठं शिखरावर जाऊन बसलाय्— अन् मी कुठं आहे? कीर्ति, पैसा या दृष्टीनं मी बोलत नाही हं हे. या नश्वर गोष्टींचा मला कधीही मोह नव्हता, आजहि नाही. पण तूं कलेच्या आराधनेत रममाण होऊन जी घोर तपश्चर्या केलीस, अलौकिक एकतानतेतून निर्माण केलेल्या कलाविश्वात अभूतपूर्व उच्चांक गांठलेस!

—आणि मी?

शेवरोलेट, 'ताज'मध्ये डीनर, मीनाकुमारी—बस्स!

हेच का माझं जीवन?







आज खरं म्हणजे मी कुठं असायला हवं होतं! विलोभनीय पदान्यासानं निर्माण केलेल्या नृत्याच्या पसाऱ्यात मध्यवर्ति स्थान मला न मागता मिळालं असतं. अभिनयाचे विविध पैलू दाखविता येण्याजोग्या मोठमोठ्या चिरस्मरणीय भूमिका आपणहून माझ्याकडे चालत आल्या असत्या...

पण आज काय त्याचं?...

विचारांच्या या कल्लोळातनं असंख्य प्रश्नांची भुतं आज माझ्यासमोर नाचताहेत. दोन कलावंत जीव सुखानं एकत्र नांदू शकतील का? परस्परांच्या सहवासात त्यांची कला सुकून जाईल की, नव्या नव्या उन्मेषांनी ती दुनियेचे डोळे दिपवील? कलावंताचा अहंकार हा त्याच्या कार्यप्रवणतेचा आत्मा आहे की, त्याला पंगु करून टाकणारा अडसर आहे?

माझ्या राजा, या प्रश्नांची खरीखुरी उत्तरं मला कुणी देईल का? तूं देशील का? मी तुला भेटायला येऊं? ....

पण कशी ? कशी ? कशी ?

त्या पौर्णिमेच्या दिवशी जमलं नाही, ते आज जमेल?

आज मी तुला भेटायला आपणहून आले तर पूर्वीच्याच आत्मिक ओढीनं तू मला सामोरा येशील? पूर्वीच्याच एकतानतेनं आपल्या हृदयवीणा तो षड्ज् साधतील? बारा वर्षांपूर्वीच्याच अचूकतेनं आपल्या भावनांचा समताल एकाच वेळी समेची टाळी देईल?

मला काही कळेनासं झालंय्.

कदाचित् सारं काही माझ्या मनासारखं होईल, असं वाटतं. पण कदाचित् नाही झालं तर?

तर....तर.....तर....

या आशंकेनंच अंतःकरणाचं पाणी पाणी होतंय् रे माझ्या.

लोक काय म्हणतील, कुणाला काय वाटेल—माझं अन् तुझं गणगोत कोणत्या दृष्टीनं माझ्याकडे पाहील...कश्शा—कश्शाची मला पर्वा नाही.

फक्त माझ्या प्रश्नांची खरी खरी उत्तरं मला हवी आहेत.. डोंगरावर उगम पावलेल्या करंगळीसारख्या निर्झरानं, वाटेत कितीहि खांचखळगे आले, झाडंझुडपं आली—तरी शेवटी नदीच्या रूपानं सागराला जाऊन मिळणं जेवढं सहज—स्वाभाविक; तितकंच मी तुला....

छे! मला अधिकार नाही तुला भेटायचा. तुझ्या जीवन-सरितेत माझा ओघ मिसळून टाकण्याची लायकी नाही माझी... तुझं जीवन म्हणजे शुभ्रधवल गंगाप्रवाह...माझं जीवन म्हणजे सुखासक्तीच्या काळ्या डोहांनी भरलेली कृष्णकाय यमुना...

पण गंगा-यमुना संगम होतोच ना?..झालेला आहेच ना?—पांच पिढ्यांची पापं क्षालन करणारं पवित्र तीर्थ, असं स्वरूप त्या संगमस्थळाला आलेलं आहेच ना!

मग—

मी जर तुला भेटले...?

तर त्यात निदान माझं एकटीचं तरी पापाचरण विशुद्धीनं उजळून उठणार नाही का?

नाही, नाही, नाही !

भोळ्या भाबड्या भाविकांच्या श्रद्धेची तकलादू कांस धरून माझ्या घोर पापांचं प्रायश्चित्त मला कधीहि घेता येणार नाही...त्या निरागस श्रद्धेचं कांचेचं कवच फोडून माझ्या घोडचुका अणकुचीदार खिळ्यांसारख्या वोंचल्याशिवाय रहाणार नाही.....

हे काय पहातेय् मी?

माझ्या मनाच्या आरशात माझं हे केवढं भयानक रुप दिसतंय् मला?

एकेकाळी माझा तो सुंदर केशकलाप कसा सळसळणाऱ्या नागिणीच्या सौंदर्यानं डुलत असे. आज हा टीचभर लांबीचा तोकडा 'पॉनी-टेल' कसा नांगी तोडलेल्या विंचवासारखा वाटतोय् पहा—

हरिणाक्षी, मदिराक्षी, मीनाक्षी इत्यादि पदव्या मला मिळवून देणारे हे माझे विशाल नेत्र; आज मात्र कृष्णवर्तुळानं वेढलेल्या निस्तेज दिवटचासारखे जेमतेम लुकलुकताहेत...

बटुवामनाच्या पावलासारखी ही चिमुकली पावलं एकेकाळी अवघ्या तीन पदन्यासात पृथ्वी पादाक्रांत करण्याची भव्य स्वप्न नाचवीत असत; कलेची आराधना करू इच्छिणाऱ्या या सुडौल देहाचा तरल भार हंसमुखानं सावरीत असत...आज रुक्ष संसार सांभाळणाऱ्या, पाटावरून ताटावर अन् ताटावरून पाटावर करीत दिवस कंठणाऱ्या या स्थूल देहाला अवघ्या तीन पायऱ्या उतरवून मोटारीत ढकलण्याचंच काम कसंबसं उरकताहेत.

अरेरे! अखेर या एकेकाळच्या जाईच्या सुकुमार फुलाचं अचानक निर्माल्य...

अचानक?

छे छे!

असल्या आकस्मिक योगायोगावर भरिभार टाकून आपल्या चुकांचं परिमार्जन करू पहाणारी पळपुटी नाही मी...

माझ्या या पराभवाचं कारण मला पुरेपूर ठाऊक आहे. कारण...

कारण तो दिवस मला पुरेपूर आठवतो.

पुरती बारा वर्षं होऊन गेली.

शरद् पौर्णिमेच्या टिपूर चांदण्यात सागरकिनारा न्हाऊन निथळत होता.

माझा लाडका राजा माझ्याजवळ होता.

माझ्या हृदयेश्वराच्या मी अगदी निकट होते.

दोन कलाप्रेमी जीव परस्परांच्या भावोत्कट सहवासात इहलोकाचं भान विसरले होते....

आपल्या सर्वस्वाची स्वामिनी मला करण्याचा लाखमोलाचा बोल तुझ्या अंतःकरणातून नुकताच उमटला होता...

त्याला जिवाच्या आकांतानं अनुकूल साद देण्याऐवजी मी गप्प बसले होते.

...समुद्राच्या काठी फरसबंदी बाकावर आपण बसलो होतो. मूकपणानं.

तुझ्या मनात कोणते विचार असतील ते मला सांगता येणार नाही, पण माझ्या मनात मात्र विचारांचं वादळ थैमान घालीत होतं...कारण....कारण...माझा निश्चय होऊन चुकला होता—

माझ्या दृष्टीनं ती आपली शेवटची भेट ठरणार होती—

कारण....

उगवत्या कलावंताच्या निर्धन संसाराची स्वामिनी होण्याऐवजी सधन उद्योगपतीची व्यवहारी तृष्णा तृप्त करण्याचंच ठरवलं होतं मी.

मी चुकले....

....हे पटतंय्—

पण—आज.....

**बरोबर बारा वर्षांनी.**

●●●




# आ व र्त

-रत्ना सुप्रिया

दोन्हीं कोपरं गॅलरीच्या कठड्यावर ठेवून, उजव्या हातामध्यें हनुवटी तोलत, समोर पाहात मी उभा आहे. हमरस्त्याच्या वर्दळीपासून दूर असलेलं आमचं घर खूप एकटं वाटतं कधी कधी. घराच्या डाव्या बाजूला एक छोटासा रस्ता सरळ, अगदी नाकासमोर पाहात लुप्त होतो. हा रस्ताही खूप lonely आहे. असं वाटतं की याला अचानक एकादी पाऊल-वाट भेटती तर त्या क्षणापुरतं तरी त्याचं जीवन कसं मोहोरून गेलं असतं.

समोरच एक अनाम वृक्ष आहे. त्याला कोवळी पालवी नुक्ती, कुठं फुटते आहे आणि तरी या हिरव्या कोवळिकीवर रंग फासून ठेवल्याप्रमाणे तुरेवार गुलाबी फुलं उमलली आहेत. हिरव्या गुलाबी रंगाचा हा मिलाप आकाशाच्या निळ्या पार्श्वभूमीवर खुलतो आहे.

कुठूनतरी माझ्या आवडत्या Come September चे सूर कानावर येतात. आज कसली तरी सुटी असल्यामुळें सारं निवांत आहे. सकाळ, दुपार आळसात गेली. आणि ही संध्याकाळ उरावर कसलं तरी जड ओझं घेऊन आली आहे. या एकांता-तलं हे भीषण सौंदर्य मनावर निरनिराळ्या कल्पनांची दडपणं आणतं आहे. Self analysis करायला लावतं आहे. सोनेरी सावळा संधिप्रकाश या वातावरणाला आणखी सोनेरी टच् देतो आहे. मी खरंच स्वप्नात तर नाही ना ?

हें स्वप्न संपेल आणि मग मीहि उरणार नाही. मी निघून गले तरी हे सारं असंच असेल. हा अनाम वृक्ष, हा एकटा रस्ता, हा संधिप्रकाश, हे आकाश, देहाच्या अवगुंठनातून निघून जाण्याची धडपड करणारा हा निश्चयी प्राण–

सारं किती खोटं, वरवरचं वाटतं आहे. हे जगणं, हे निर्माण करणं, हे इथल्या मायेंत पूर्णपणे गुरफटून जाणं–

एखादी कविता लिहून झाल्यावर मनाला होणारा निर्मि-तीचा आनंद, हा आनंद कां होतो ? एखादं सुंदर चित्र कुंचल्या-तून उतरल्यानंतर बेहोष होणारा हा प्राण–ही बेहोषी कुठून येते ? या देहातून ? या प्राणातून ? आणि तरीहि हे सारं किती तोकडं, किती वरवरचं आहे. उद्यां उजाडला कीं, नवी संगत, नवी रंगत. सुख इतकं बेसूर. इतकं बेचव असूं शकतं ?



संधिप्रकाशाचा एक कवडसा माझ्या केसां-वर एखाद्या गजऱ्या-सारखा माळला गेलाय्. माझे पिंगट केस उन्हाच्या गजऱ्याच्या आपुलकीनं चमकताहेत. पण तरी हे सारं संप-णार आहे. या जाणीवेनं भीति वाटते आहे कां ? नाहीं–जाणवते आहे ती फक्त पोकळी–जिवाला आत ओढून घेणारी, विचारांना मूढ, अगतिक करणारी. संसाराबद्दल दुरावा निर्माण करणारी—

किती ओढ वाटली होती साऱ्याची एके काळी. छोटसं घर, इवलाली बाग, जीवनाला आधारून नेणारं तुझं नांव, चिमणी पांखरं, इन्द्र धनुष्याचे साती रंग ज्यावर उधळून द्यावे असा प्रीतीचा मोहक रंग–सारं कसं फाटून गेलंय्.

"तुझे शब्द फार सुंदर आहेत. तुझा आवाज किती मधुर आहे. तूं माझं नांव घेतेस तेव्हा तुझ्या स्वरात ते नादावून जातं, लोभावतं–"

शब्द, या शब्दातून अर्थाचा ध्यास घेणारं मन, स्पर्श हवासा भासवणारं शरीर –सारं परकं, तरीहि कधी हवसं वाटणारं– पण म्हणूनच हृदयाच्या मंजूषेत बांधून ठेवलेलं.

कीट्सच्या व्यथेनं भरलेल्या त्या ओळी–

"My heart aches,

And a drowsy numbness pains my heart."

सुखाच्या भरल्या क्षणी रितं होऊं पाहणारं मन, वेदनेच्या क्षणी डोळ्यांपुढे उभं राहणारं सुख. दुःखाची वेदना आणि सुखाची सुद्धां वेदनाच ! मनाला रितवून टाकणाऱ्या या दोन्हीं वेदनांचं अंतःस्वरूप किती सारखं आहे.

आणि मन असं रिकामं होत असतं तेव्हाच आंतल्या गाभाऱ्यांतून कुठूनतरी शब्द घरंगळत बाहेर येतात, अर्थाला कवेत घेण्यासाठी धडपडतात. तेव्हा मी कुठें असते ? मी नसतेच तिथं–मी आहे फक्त शरीर, जगणारं डोळ्यांना दिसणारं म्हणून खरं भासणारं, म्हणूनच खोटं असलेलं. मनाला मारून टाकणारं. शेवट आहे तो सारा तुझ्या अस्तित्त्वात–मला शोधता शोधता मी येते तो तुझ्या दारात–तुझ्या नांवाशी माझं नांव निगडून घेण्याच्या अभिलाषेनं–

आणि तिथंच सारं संपतं !

........................................









किती केलं तरी तो 'गाढवा'चा हट्ट !!
समजुत घालणार कोण आणि कशी ?
अखेर फ्रान्सिस्कोनं त्याला
उचलून घेतलं. कल्पना 'कशी शीच' वाटते नाही ?
पण तुम्ही सुद्धा.... त्यासाठी वाचा ही कथा—



अनु— प्रा. मनोहर सरदेसाई

**न्युनेन** गांवचं शेवटचं घर आलं. घराबाहेरच्या बाकड्यावर बसून एक माणूस विडी ओढीत होता. श्वित्झचा रस्ता हाच का म्हणून आम्ही त्याला विचारलं तेव्हा त्यानं हो म्हटलं. आणि आमची खात्री पटवून देण्यासाठी एक शेतकरी आणि त्याचा गाढव त्याच रस्त्यानं जात होते त्यांच्याकडे बोट दाखविलं. "ते पण इवाकला जात आहेत. आणि रस्ता रहदारीचा आहे. तेव्हा वाट चुकण्याची मुळीच धास्ती नाही" असंहि त्यानं सांगितलं. ह्या खुलाशामुळं आम्हाला जरा धीर आला अन् आमच्यापुढं रस्त्याच्या वळणाआड अदृश्य झालेल्या आमच्या दोन वाटाड्यांचा आम्हाला जवळजवळ विसरच पडला.

वळणावर पोचताच मात्र न्युनेनच्या दिशेनं चौखूर धावत असलेला तो गाढव दृष्टीस पडला. आपल्या आगमनाची वर्दी देण्यासाठीच की काय तो घसा फोडून ओरडत होता. त्याच्यामागून तो शेतकरी धावत येत होता. आपल्या जनावराला मागं फीर म्हणून काकुळतीनं विनवीत होता. त्याचं मन वळविण्याकरिता शेतकऱ्यानं वापरलेल्या भाषेचा त्या गाढवावर जरी काहीच परिणाम झाला नाही तरी ती माझी मायबोली असल्यामुळं मला मात्र त्या म्हाताऱ्याचा कळवळा आला. आणि ज्या क्षणी तो गाढव माझ्या जवळून जाऊ लागला त्याच क्षणी मी शिताफीनं त्याचा लगाम पकडला. पण माझ्या ह्या कृतीकडे मुळीच लक्ष न देता तो तसाच धावू लागला. एका गाढवापुढं हार खाण्याची माझी मुळीच तयारी नव्हती. मला चीड आली आणि मी जोर-जोरात लगाम ओढू लागलो. थोडक्यात सांगायचं म्हणजे जर माझा नोकर फ्रान्सेस्को माझ्या मदतीला धावून आला नसता अन् त्यानं गाढवाच्या ढुंगणावर काठीने रट्टे दिले नसते, तर विजय कुणाचा झाला असता हे सांगणं कठीण आहे. मारामुळं गाढव नरमला आणि त्यानं हार मान्य केली. इतक्यात शेतकरी येऊन पोचला आणि आम्ही आमच्या कैद्याला त्याच्या स्वाधीन केलं.

बिचारा शेतकरी घामानं ओलाचिंब झाला होता. आम्हाला वाटलं आता तो गाढवाला चांगलीच शिक्षा करील. पण त्याला त्यानं ममतेनं गोजारलं तेव्हा आमच्या आश्चर्याला सीमाच राहिली नाही. त्याच्या फाजील कनवाळूपणाविषयी मी अचंबा व्यक्त केला. त्याच्या लहरी स्वभावाला अशा तऱ्हेनं

उत्तेजन दिलं तर गाढव पार बिघडून जाईल असं पण बोलून दाखविण्यास कमी केलं नाही.

"छे हो !" तो शेतकरी म्हणाला.

"लहरी स्वभावाचा प्रश्न नाही हा. बिचाऱ्या पिएरोला भय वाटलं."

"कशाचं भय ?"

"रस्त्यावर मुलांनी विस्तव पेटविला होता, त्याचं भय वाटलं पिएरोला."

"अस्सं होय ! विस्तवाचं भय ही मोठी खोडच म्हणायची तुमच्या पिएरोची."

"पण काय करणार ! ती खोड काही त्याला काढून टाकता येत नाही." शेतकरी कळवळ्यानं उत्तरला.

"पण तुम्ही त्याच्यावर बसलेले असताना जर त्याला भय वाटलं, तर तुमचा कपाळमोक्षच व्हायचा याची जाणीव आहे ना तुम्हाला ? तुम्ही पट्टीचे स्वार असाल तर गोष्ट वेगळी ! पण मला काही तसं नाही वाटत."

"तुम्ही म्हणता ते अगदी बरोबर आहे " शेतकऱ्यानं माझं बोलणं पटल्याचा आविर्भाव करीत म्हटलं, "अन् म्हणूनच मी त्याच्यावर कधीच बसत नाही."

"म्हणजे हे जनावर तुम्हाला चांगलंच उपयोगी पडतं म्हणायचं !"

"पण आधी तो किती आज्ञाधारक, किती कष्टाळू अन् किती धीट होता म्हणून सांगू ? साऱ्या गांवात त्याच्यासारखा दुसरा गाढव मिळाला नसता."

"तर मग तुमच्या फाजील लाडानं तो बिघडून गेला असला पाहिजे." मी टोमणा मारला.

"असं कसं म्हणतां ! एका अपघातामुळं त्याची ही अशी दशा झालीय् !"

"हं चला आता, पिएरो !" गाढव पुन्हा थबकला होता त्याला ढकलीत मी म्हटलं.

"थांबा जरा. त्याला पाण्यातून जाणं आवडत नाही."

"म्हणजे? पाण्याचं पण भय वाटतं की, काय त्याला ?"

"होय. . ."

"म्हणजे हा गुणी गाढव दिसेल त्या गोष्टीला घाबरतो म्हणायचा."

"तो जरा भित्रा आहे हे खरं. हं, पिएरो, चल."

दहा बारा फूट रुंदीच्या एका ओढयाच्या काठी आम्ही पोचलो होतो. पाण्याला भारी भिणारा पिएरो जमिनीत खूर रोवून तीरावर उभा राहिला होता. रेसभर देखील पुढं जाण्याची त्याची तयारी दिसेना. त्याचा निश्चय अगदी पक्का होता. शेतकऱ्यानं खूप प्रयत्न केला, पण पिएरो मुळीच हलेना. मी त्याची दोरी पकडली अन् ओढायला सुरुवात केली. पण पिएरोनं आपले मागचे खूर जमिनीत अधिकच खोल रोवले. फ्रान्सेस्को त्याला मागून ढकलू लागला. आम्ही आमचा सारा जोर एकवटला. पण पिएरोवर त्याचा काहीच परिणाम झाला नाही. त्या गाढवापुढं हात टेकण्याची माझी इच्छी नसल्यामुळं मी दोरी एवढया जोरानं ओढली की, शेवटी ती खसकन् तुटली. दोरी तुटल्याचा परिणाम सर्वांवर जरी सारखाच झाला तरी तपशील मात्र प्रत्येकाच्या बाबतीत अगदीच वेगवेगळा सांगायला हवा. शेतकरी पाठीवर पाण्यात पडला. मी दहा फूट मागे घसरत घसरत धुळीत जाऊन पडलो. आणि आपण मुक्त झाल्याच्या आनंदात पिएरो पुढे सरसावल्यामुळे, फ्रान्सेस्कोचा आधार नाहीसा झाला आणि त्याचं नाक आणि हात चिखलाने बरबटून निघाले.

"तो मुळीच हलणार नाही हे ठाऊक होतं मला." तुमानीचा खालचा भाग पिळीत शेतकरी संथपणं म्हणाला.

"पण तुमचा पिएरो म्हणजे एक अवलक्षण आहे नुसतं." कपडयांवरील धूळ झाडीत मी म्हटलं.

"सैतान नेवो त्याला !" फ्रान्सेस्को पुटपुटला. आणि जेथे पाणी गढूळ झालं नव्हतं तिथं हात धुण्यास गेला.

"माझ्यासाठी एवढी तसदी घेतली म्हणून फार आभारी आहे मी तुमचा." शेतकरी म्हणाला.

"कसचं ! कसचं ! पण आमच्या प्रयत्नांचं काहीच चीज झालं नाही. म्हणून वाईट वाटतं एवढंच."

"असं कसं म्हणता ! आपण प्रयत्नांची शिकस्त केली म्हणजे वाईट वाटण्याचं कारण नाही राहत."

"बरं. पण आता हा ओढा तुम्ही कसा पार करणार ?"

"दुसऱ्या वाटेनं जाईन मी."

"म्हणजे, तुम्ही पिएरोपुढं हार खाणार की काय ?"

"नाहीतर काय करणार ? तो काही माझ्यापुढं हार खायला तयार नाही; तेव्हा मलाच—"

"छे ! छे ! असं नाही चालायचं ! मी पिएरोला माझ्या पाठीवर घेऊन ओढा पार करीन."

"पण पिएरो फार जड आहे म्हटलं." मान हलवीत शेतकरी म्हणाला.

"छान ! लगाम पकडा त्याचा. मला एक कल्पना सुचलीय् !"

पिएरो एका झुडुपाची पानं खाण्यात गुंतला होता. शेतकऱ्यानं जाऊन त्याचा लगाम पकडला.

"हं ठीक." मी म्हटलं. "आता त्याला ओढयाच्या अगदी जवळ आणून ठेवा. कळलं ?"

"बस् ?"

"छान ! फ्रान्सेस्को, तुझं हाततोंड धुवून झालं का ?"

"होय, साहेब."

"तुझी काठी दे इकडे माझ्याकडे. अन् पिएरोच्या डोळ्यासमोर जाऊन उभा रहा."

फ्रान्सेस्कोनं काठी माझ्या हवाली केली अन् माझ्या सांगण्या-प्रमाणं केलं. शेतकरी आपल्या गाढवाला अजून ममतेनं गोंजारीत होताच.

ह्या संधीचा फायदा घेऊन मी गाढवाच्या मागं जाऊन उभा राहिलो. आपल्या धन्याच्या लाडांचा स्वीकार करण्यात तो गाढव गुंतला असता, मी आमच्या दोन काठ्या त्याच्या पायामध्ये घातल्या. फ्रान्सेस्कोला माझा उद्देश लगेच कळला. मेणा उचलण्याच्या तयारीत असणाऱ्या भोयाप्रमाणे त्यानं पाठ








फिरविली. आणि मी पुढं केलेल्या काठ्या मागून पकडल्या. मी "उचल" असं म्हणताच पिएरोचे पाय अंतराळी लोंबकळू लागले. आणि "आगे बढो" असा हुकूम सोडताच पिएरोची स्वारी पुढं निघाली. जणू काय तो मेण्यातील गृहस्थ आणि आम्ही भोई.

आमच्या ह्या नावीन्यपूर्ण शकलीनं भांबावून गेल्यामुळं म्हणा, प्रवासाची ही तऱ्हा आवडल्यामुळं म्हणा, किंवा आमच्या तुफानी पद्धतीचं वर्चस्व मान्य झाल्यामुळं म्हणा, पिएरोनं कसलाच प्रतिकार केला नाही आणि आम्ही त्याला सुखरुप दुसऱ्या तीरावर नेऊन ठेवलं.

गाढव पूर्व स्थितीवर येताच शेतकरी म्हणाला, "एकंदरीत बरीच अद्भुत घडली म्हणायची ! तुझं काय मत आहे, पिएरो !"

जणू काय काहीच घडलं नव्हतं अशा अविर्भावानं पिएरो वाट चालू लागला.

"हं. आता तुमच्या गाढवाला घडलेला अपघात आणि त्याला आग आणि पाणी याचं भय कां वाटतं ते सांगा मला. मी नुकतेच तुमच्यावर जे उपकार केले त्याची फेड म्हणून तरी ती हकीकत तुम्ही सांगायलाच हवी."

पिएरोच्या मानेवर हात ठेवीत शेतकरी म्हणाला, "ती गोष्ट घडल्याला पुढच्या नोव्हेंबरात दोन वर्षं होतील. बर्फ फार पडलं होतं. आजच्या प्रमाणंच एका रात्री पिएरोला घेऊन मी न्युनेनहून परत येत होतो (माझ्या पिएरोला भय म्हणजे काय ते ठाऊक नव्हतं त्यावेळी !) माझा मुलगा (त्यावेळी तो हे जग सोडून गेला नव्हता.), माझी सून, फिदॅल आणि मी एवढी मंडळी एका आगीभोवती शेकत बसलो होतो."

"माफ करा जरा." मी मध्येच म्हटलं. "एखादी गोष्ट ऐकताना, त्या गोष्टीतील पात्रांची ओळख करून घेण्याची मला संवय आहे. फिदॅल ही कोण व्यक्ति ?"

"फिदॅल होय ! अहो तो आमचा कुत्रा ! पण कसला कुत्रा म्हणून सांगू?"

"हं. कळलं. आता सांगा पुढं."

"देवदारांच्या वनातून वाहणाऱ्या वाऱ्याची खळबळ ऐकत आम्ही शेकत बसलो होतो. इतक्यात कुणीतरी दार ठोठावलं. मी धावत जाऊन ते उघडलं. वाट चुकलेले दोन तरुण बाहेर उभे होते. ते सांतआभाहून वाटाड्याशिवाय बाहेर पडले होते. थंडीनं गोठून गेले होते. अगदी मी त्यांना शेकोटीजवळ बोलाविलं. ते ऊब घेत असता, मारिआननं बकरीचं मांस शिजविलं. ते अगदी अर्धमेले झाले होते; तरी पण होते खुशालचेंडू अन् गमत्ये. विस्तव पेटविण्याचं सर्व सामान जवळ होतं म्हणूनच ते बचावले होते. काटक्या गोळा करून दोन तीन वेळा त्यांनी शेकोटी पेटविली होती; आणि ऊब घेऊन तरतरी येताच ते पुन्हा वाट चालू लागत. अशाप्रकारे चालत चालत ते आमच्या घरापर्यंत येऊन पोचले होते. जेवणानंतर मी त्यांना एका खोलीत घेऊन गेलो. खोली काही चांगली नव्हती, पण करणार काय ! ऊबदार मात्र होती. कारण तिचं एक दार गोठ्याला लागून असल्यामुळं जनावरांची ऊब आतील माणसांना मिळे. बिछाना तयार करण्यासाठी म्हणून मी गवत आणायला गेलो अन् दार तसंच उघडं टाकलं. इतक्यात माझ्यामागून पिएरो खोलीत शिरला. अन् माझ्या हातातलं गवत खाऊ लागला. पिएरो कोंकरासारखा गरीब होता म्हणून आम्ही त्याला मोकळाच ठेवीत असू.

"फार गुणी दिसतंय् हे जनावर" एका प्रवाशानं म्हटलं.

"अगदी बरोबर ! तुमच्या लक्षात आलंच असेल बहुधा की, पिएरोसारखा गाढव मिळायचा नाही कुठं."

मी मान डोलावली.

"नांव काय त्याचं ?" त्या दोघांपैकी जो मोठा होता त्यानं विचारलं."

"त्याचं नांव पिएरो. हांक मारून बघा. धावत येईल तुमच्याकडे."

"याच्यासारख्या गाढवाला काय किंमत पडेल ?"

"वीस ते तीस एक्यू."

"बस् ?"

"तो काम करतो त्याच्याकडे पाहिलं तर ही रक्कम काहीच नाही. चल पिएरो, माझ्या लाडक्या, पाहुण्यांना झोपू दे."

"माझ्या बोलण्याचा अर्थ आपल्याला समजला आहे हे दाखविण्यासाठी पिएरो माझ्यामागून आला. मी दार बंद केलं. अन् पाहुण्याना आणखी त्रास नको म्हणून मुख्य दारानं घरात गेलो. काही वेळाने, ते पोट धरून हसत असल्याचं मी ऐकलं."

"बरं आहे ! ज्या घरांतील पाहुणे आनंदी, त्या घरावर ईश्वराची सदैव कृपा असते !"


MEXICO—*Facha* (*Excelsior*)

"दुसऱ्या दिवशी सात वाजता आमची तरुण पाहुणे मंडळी जागी झाली. माझा मुलगा पहाटेलाच शिकारीला गेला होता. बिचाऱ्या फ्रांस्वाला शिकारीचा भारी नाद. मारिआननं न्याहरी तयार करून ठेवली होतीच. आमच्या पाहुण्यांना सपाटून भूक लागली होती. पोटभर खाऊन झाल्यावर त्यांनी विचारलं किती पैसे? मी म्हटलं तुम्हाला काय वाटेल ते द्या. मारीआनला त्यांनी एक सोन्याचं नाणं दिलं. मारीआन ते परत करू लागली. पण ते काही ऐकेनात. बेटे फार श्रीमंत होते असं वाटतं."

त्यांच्यापैकी एकजण म्हणाला,

"पण हे बघा, आमचं काम संपलं नाही अजून; तुम्ही पिएरोला आमच्या बरोबर न्युनेनपर्यंत पाठविलं पाहिजे."

मी म्हटलं, "अलबत्, तिकडे पोचताच पिएरोला "गरुड विश्रांतीगृहा"च्या मालकाच्या स्वाधीन करा. मी पुढच्या खेपेस बाजारासाठी न्युनेनला जाईन त्यावेळी त्याला परत घेऊन येईन. पिएरो तुमच्या सेवेस हजर आहे. आळीपाळीनं बसून जा त्याच्यावर. किंवा दोघेही बसून गेलात तरी चालेल. आमचा पिएरो तसा बळकट आहे फार."

इतक्यात दुसऱ्यानं म्हटलं, "पण समजा पिएरोला वाटेत एखादा अपघात झाला . तर—"

"अपघात कसला होणार?" मी म्हणालो, "इथून इबाकपर्यंतचा रस्ता तर चांगला आहे. आणि इबाक ते न्युनेनपर्यंतच्या रस्त्याविषयी तर प्रश्नच नाही."

"पण कुणी सांगावं?" त्याच्या किंमती एवढी रक्कम ठेवून दिलेली बरी नाही का?"

"छे! छे! काही जरुरी नाही. तुमच्यावर पूर्ण विश्वास आहे माझा."

"तुम्ही आमची अट मान्य केल्याशिवाय आम्ही पिएरोला घेऊन जाणार नाही."

"बरं तर तुमची मर्जी. तुम्हाला हवं तसं करा."

"पिएरोची किंमत तीस एक्यू म्हणून सांगितलं होतं ना तुम्ही?"

"हो किमान तीस."

"बरं तर. हे घ्या चाळीस एक्यू. पैसे मिळाल्याची पावती द्या. तुमचं जनावर सुखरुप गरुड विश्रांतिगृहाच्या मालकाच्या स्वाधीन केलं तर आम्ही त्याच्याकडून पावतीत दाखविलेली रक्कम वसूल करू. पण पिएरोला एखादा अपघात झाला तर ते चाळीस एक्यू तुमच्याजवळच राहतील."

"याला म्हणतात डोकं, नाही का? माझी सून गोल्दो गांवच्या शाळामास्तरची मुलगी. तिला लिहिता वाचता येतं. तिनं लगेच एक पावती लिहून दिली. पिएरोवर खोगीर वगैरे घालून झाल्यावर ते जाण्यास निघाले. बिचारा पिएरो! आम्हाला








अनुक्रमणिका

सोडून जाण्यास त्याचं मन होईना. माझ्याकडे अगदी काकुळतीनं पाहू लागला तो ! मला त्याचा कळवळा आला अन् मी त्याच्या तोंडात पावाचा एक तुकडा घातला. आमच्या पिएरोला पाव भारी आवडतो. पाव मिळताच सांगेल ते करायचा तो. मी नुसतं चल म्हणताच पिएरो चालू लागला. त्यावेळी आमचा पिएरो किती आज्ञाधारक होता म्हणून सांगू! एखाद्या कुत्र्यासारखाच जणू !"

"पण आता फार बदल झालेला दिसतोय् स्वारीत. वयामुळं असेल कदाचित्" मी टोमणा मारला.

"पिएरोचं वय सांगणं जरा कठीण आहे. पण त्याची ही अशी स्थिति झालीय् ती वयामुळं नव्हे तर अपघातामुळं."

"वाटेत असं घडलं तरी काय ?"

"काय सांगू ? अन् घडलं ते तरी किती भयंकर होत नाही का रे माझ्या पिएरो ?"

"काय झालं ते सांगा तर खरे."

"तुम्हाला कल्पना देखील येणार नाही त्याची. त्या गंमतखोरांनी एक शक्कल लढविली. अन् ती तरी किती और ! "आधल्या दिवसाप्रमाणे रस्त्यात वारंवार थांबून शेकून न घेता चालता चालताच शेकून घेणं ही ती कल्पना होती. अन् ही कल्पना अंमलात आणण्यासाठीच त्यांनी पिएरोला बरोबर घेतलं होतं. माझा एक शेजारी जंगलात काम करीत होता. त्यानं हे सारं पाहिलं होतं. त्यानंच मला सार काही नंतर सांगितलं. त्या वाटसरूंनी आधी पिएरोच्या खोगीरावर ओल्या गवताचा थर टाकला. वर बर्फाचा थर ठेवला. पुन्हा त्याच्यावर गवताचा दुसरा थर अन् त्यावर शेवटी काटक्यांची मोळी. अशी ही रचना होती. नंतर खिशातून आगपेटी काढून त्यांनी मोळी पेटवली. यामुळं पिएरोबरोबर चालत राहिलं की ऊब मिळे. शिवाय सिगरेट पेटवायची झाली म्हणजे नुसता हात लांबविला म्हणजे झालं काम. घरात शेकोटीजवळ बसल्यासारखंच होतं हे. जवळजवळ एक कोसभर हे असं सुरळित चाललं. ऊब घेत घेत त्यांनी शोनेम्बुक गांवाची दुसरी हद्द गांठली. शेकोटीत काटक्या घालायला ते वाटेत थांबले होते तेवढेच. त्यांना बघण्यासाठी गावातील सर्व लोक आपल्या घरातील दाराजवळ उभे होते. हे असलं दृश्य कधीच कुणी पाहिलं नव्हतं. काय कळलं ना ? पण आस्ते आस्ते बर्फ वितळलं होतं. अन् गवताचे थर सुकून गेले होते. आग हळूहळू खाली येत होती, पण आमच्या मुशाफीरांना त्याची मुळीच दाद नव्हती. आग जसजशी खाली येऊ लागली तसतशी पिएरोच्या कातडीला भिडू लागली. अर्थात् त्या आगीची चुणूक आधी पिएरोलाच लागली. तो कातडी हलवू लागला. ओरडू लागला, नंतर धावू लागला. अन् शेवटी अशा उड्या मारू लगाला की, आमच्या जवानांना त्याचा पाठलाग करता येईना. पिएरो उड्या मारीत मारीत एका ओढयाच्या काठाजवळ पोचला. पण कांठ फार उतरता असल्यामुळं पिएरो पाय घसरून पाण्यात पडला. पिएरोविषयी आणखी काळजी न करता आमचे खुशाल चेंडू आपली वाट चालू लागले. पिएरोची किंमत तर त्यानी आगाऊच देऊन ठेवली होती.

दोन तासानंतर पिएरो सापडला. त्याची आग विझली होती. पण ओढयाचे तीर बरेच उतरते असल्यामुळे, पिएरोला वर येता आलं नाही. अन् त्या गोठलेल्या पाण्यात त्याला तेवढाच वेळ रहावं लागलं. सांगायचं तात्पर्य म्हणजे एकदा भाजून गेल्यावर तो गोठून गेला. त्याची हुडहुडी घालवण्यासाठी त्याला विस्तवाजवळ नेण्यात आलं. पण आग दृष्टीस पडताच तो वेड्यागत पळत सुटला. आणि रस्ता ठाऊक असल्यामुळं घरी परतला.

"त्या वेळेपासनं त्याला आगीचं, पाण्याचं फार भय वाटतं."

पिएरोच्या नावडीपेक्षा अधिक विलक्षण खोडी मला ठाऊक असल्यामुळे मला त्याच्या नावडीचा उमज पडला अन् त्याच्या दोन उनाड कृत्यांमुळं त्याच्याविषयी माझं मन कलुषित झालं होतं ते आता साफ धुवून निघालं.

( आधारित )

●●●












# संत तुकारामाचा शेवट

-गोपालसिंग परदेशी

**संत तुकारामाचे सदेह वैकुंठगमन हे आपणा साऱ्यांनाच ठाऊक आहे. त्यात काव्य आहे. कल्पकता आहे आणि ईशभक्तीचा थोर महिमाही आहे. परंतु अलिकडे काही नवे संशोधन प्रकाशात येत आहे. वृत्तपत्रातून प्रकट चर्चाही होत आहेत. त्यामुळे तुकारामाच्या 'सदेह' वैकुंठगमनाविषयी संशय उत्पन्न झाला आहे. काही ऐतिहासिक पुराव्यांची छाननी करून प्रस्तुत लेखात ह्या 'प्रकर्णा'ची आणखी एक बाजू मांडली आहे. 'सेन्सेशन' निर्माण करण्याचा हेतु या प्रकाशनामागे नाही. एका महत्त्वाच्या पण विवाद्य अशा प्रश्नाला काही चालना मिळावी एवढाच हेतु—संपादक.**

**केवळ** श्रद्धा व चमत्कार यावर संतचरित्रे आधारली जातात. गांवोगांव बिदाऱ्यांसाठी हरदासांनी नाना कल्पनांचे रंग भरून संतचरित्रे उठावदार केली. परंतु नव्या युगाच्या शास्त्रीय कसोटी-वर, चिकित्सेच्या भट्टीत हे सगळे हीण जळून जाणार आहे. शेंदराच्या लेपांची ढलपी उडून जाऊन खरोखर आतील मूर्ति जशी असेल तसे दर्शन यापुढे होणार आहे. आजवर संतचरित्रे रचताना स्तोत्रापुराणांचे अनुकरण केले गेले तरी या बदलत्या चिकित्सा युगात श्रद्धाळु कल्पनांवर जगणाऱ्यांना धक्के बस-णार आहेत–एवढे खरे!

तुकारामाच्या चरित्राचा सर्वात महत्त्वाचा भाग म्हणजे त्याचा शेवट कसा झाला हा होय. तुकारामाचा खून झाला आणि गुन्हेगारांनी खुनाचा पुरावाही नाहीसा केला म्हणजे त्याचे प्रेत-सुद्धा नाहीसे केले. या खुनाचा मुख्य सूत्रधार व प्रमुख आरोपी म्हणजे मंबाजी गोसावी हा होय. इ. स. १६४९ फाल्गुन वद्य प्रतिपदेच्या मध्यरात्रीनंतर हा खून झाला. १६४९ च्या अगोदरच्या दोन तीन वर्षातील तुकारामासंबंधी चक्षुर्वैसत्यम् हकिगत सांगणारी बहिणाबाई सिऊरकर ही एकमेव साक्षीदार आहे.

तुकारामाचा जन्म इ. स. १६०८ मध्ये देहूला झाला. त्याचे पूर्ण नांव तुकाराम बोल्होबा आंबिले. जात कुणबी किंवा मराठा. धंदा वाण्याचा. त्याच्या मागच्या ९ व्या पिढीतल्या विश्वंभर नांवाच्या पूर्वजाने देहुचे विठ्ठलाचे देऊळ बांधले. १६३०–३२ च्या भयंकर दुष्काळात कुटुंबातील माणसांची व धंद्याची वाताहत होऊन तुकारामाच्या मनावर आघात होऊन तो विरक्त झाला. संत वाङमयाचे श्रवण व अभ्यास करण्यात ५–७ वर्षे गेली. त्यानंतर त्याच्या प्रतिभेच्या प्रकाशाने आसमंत दिपून गेले.

बहिणाबाई १६४७ च्या सुमारास देहूस आली. तिच्याबरोबर पति वगैरे घरची माणसे होती. बहिणाबाई देहूस दोन वर्षे म्हणजे तुकारामाच्या मृत्युपर्यंत होती तर मंबाजी गोसावी तिच्याही अगोदर १२ वर्षे देहूस येऊन स्थायिक झाला होता. तो देशस्थ ब्राह्मण असून चिंचवडच्या केशवराज देवांचा एक शिष्य होता. केशवराज देवांनी मरकळ या गांवी देवाची स्थापना केली व ते आपल्या सखोबा नांवाच्या ब्राह्मणेतर शिष्यास घेऊन त्या गांवी रहावयाला गेले. मंबाजीची पात्रता माहित असल्यामुळे देवांनी त्यास जवळ घेतले नाही. परंतु हीच अपमानाची गोष्ट समजून मंबाजीने आपल्या सद्‌गुरुंना व देवस्थानाला सोडले व तो बुवाबाजीच्या घोळासाठी एखादे भक्ष्य मिळते कां हे शोधू लगला. पुणे प्रांतात त्याला देहूचे देवस्थान हेच एकमेव भक्ष्य दिसू लागले. त्याला अपेक्षित असलेली माणसे व परिस्थिति तेथे दिसू लागली. तो देहूला प्रविष्ट झाला. त्याने देवस्थान प्रमुखाची–म्हणजे तुकारामाची भेट घेतली. तुकारामाने त्याला देवस्थानाच्या खटपटेस ठेवले. संतस्वभावाप्रमाणे नम्रभावाने त्याचे स्वागत केले.

देहुजवळ एक शेत होते. बागाईत व जिराईत मिळून पंधरा बिघ्याचे. हे शेत आंबिले घराण्याच्या विठ्ठल देवास पूर्वीपासून इनाम होते. त्यामुळे या शेतास विठ्ठल टिके हे नामाभिधान प्राप्त









### शिव्याख्यान

| | |
|---|---|
| पहिली माझी शिवी | येई माझ्या कामा |
| जिन्या जवळीं रामा | भांडी घासी |
| दुसरी माझी शिवी | दुधाच्या भैयाला |
| पाण्यामध्यें दुधाला | घाली मेला |
| तिसरी माझी शिवी | पोक्ष्यांच्या पोरीला |
| नळावरी मेलीला | तोंड सुटे |
| चवथी माझी शिवी | आमच्या ह्या 'धन्याला' |
| आले कसे आईबाप | जाणे आईबाप |
| पांचवी माझी शिवी | पांची कारट्यांना |
| पूजा उरकाना | पोटोबाची |

—ह. शि. खरात

झाले होते. तुकारामाची कीर्ति ऐकून व त्याच्या साक्षात्काराचा ध्यास घेऊन बहिणाबाई देहूस आली. ही बाई देवलसी असून अत्यंत सात्विक अंत:करणाची भक्त होती. जयराम स्वामीची तिच्यावर कृपादृष्टी असून स्वप्नात आपणास तुकाराम उपदेश करीत आहे अशी तिला स्वप्न प्रतीति आली होती. ती लिहिते—मध्यान्ह जालिया पाहिजे ते अन्न। भ्रतार जाउनी ग्रामी हिंडे ! कोंडाजी नामें ब्राह्मण भेटला व त्याने या मंडळीस भोजनास बोलाविले. तो म्हणाला "वृत्तांत पुशिला कोठुनी आलात। चालतसा पंथ कवण ठाई। कांही बाही तया सांगितले पूर्व। म्हणे रहा सर्व पर्वणीशी। सोमवारी आहे आमवास्या पुढें । रहा भक्ति कोडे सुख घ्यावे। नित हरिकथा होतसे देऊळी। तुकोबा माउली वैष्णवाची।। रहा येथे तुम्हा भक्षावया धान्य । देऊ हेही पुण्य आम्हा घडे। बहिणी म्हणे मग राहिलो देहूस। धरुनी हव्यास तुकोबांचा। तुकोबाची कथा। वेदांतील अर्थ। पावे माझे चित्त समाधान। रात्रंदिन निद्रा नसे तिळभरी। तुकोबा अंतरी प्रवेशला। बहिणी म्हणे येती सुखाचे डोलावे। जाणती अनुभवे जाणते ते।

मंबाजीच्या तेथेही ही मंडळी राहिली. आपल्या शिष्यगणांचा ताफा वाढविण्यासाठी मंबाजी फार आतुर होता. परंतु ही माणसे आपले शिष्यत्व स्वीकारावयास तयार नसून तुकारामाचे शिष्यत्व व त्याचीच सेवा करू इच्छितात असे दिसताच त्याने त्यांना घराबाहेर काढले. तेव्हा ही माणसे तुकारामाच्या "आनंद वोवरी"त उतरली. बहिणाबाईजवळ एक गाय होती. एखाद्या निरलस भक्ताप्रमाणे त्या गाईची वागणुक होती. ते पाहून गांवकरी चकित झाले. तिच्या विशिष्ट वर्तनामुळे लोकात कुतुहल वाढले तेव्हा मंबाई गोसाव्याचा तिळपापड झाला. त्याने पुणे शिरवळचा देशमुख (वेदोनारायण) अप्पाजी गोसावी याजकडे गुप्तपणे लेखी तक्रार दाखल केली. बहिणाबाईच्या माणसांची गांवात नालस्ती चालविली. मंबाजीने तिला रस्त्यात गाठून दम दिला की तुम्ही सोनार किंवा गोळक असला पाहिजेत. तुम्हास अपंक्त करावयास लावतो. तेव्हा तिने झालेली हकिगत महादजी कुलकर्णी व कोंडाजीपंत यांना सांगितली. मग तिही नेले आपुल्या घरासी । म्हणे की तयासी काम काय !

नालस्ती करूनही लोक ऐकत नाहीत असे पाहून तो चिडला व त्याने बहिणाच्या त्या गाईला आपल्या घरात कोंडून मारले. तिला कोंडून बांधून मारण्याचे काम मंबाजी तीन दिवस करीत होता. या आचरट कृत्यामुळे चोरीच्या आरोपाखाली दिवाणाच्या दंडास व लोकांच्या उपहासास तो कारण झाला. लोक क्रोधाने संतप्त झाले होते. त्याला शिक्षा करणार होते. तोही घावरला होता पण तुकारामाने मध्यस्ती करून त्याला वांचविले. लवकरच त्याच्या घराला आग लागली व अपमानित होऊन लोकांच्या धाकाने तो तुकारामाला मानू लागला. विठ्ठलाची पूजा अर्चा करू लागला. सहकार्य देऊ लागला. तुकाराम त्याला वडिल या दृष्टीने प्रतिष्ठेने वागवू लागला. गाईच्या छळाच्या वेळेस रामेश्वर भट्ट ऐकिला वृत्तांत। धावोनी त्वरित तेथे आला। तुकोबाचे तिही घेतले दर्शन गाय तेही पूर्ण पाहियेली.

तुकारामाच्या सान्निध्यातील माणसापैकीच रामेश्वर भट्ट याचाही उल्लेख बहिणा करते. हा वाघोलीचा लहानसा वतनदार. तेथे व्याघ्रेश्वर हा देव आहे. भाउबंदकीत वाघोलीच्या वतनाच्या दोनदा कथला पडला होता. दोन वेळा हरलेल्या वादी पथकीनी तिसऱ्यांदा दावा सांगितला असताना सुद्धा रामेश्वराला दिव्य घ्यावे लागले. वादासाठी लागला लाग व वेचला वेच खोट्या पासून घ्यावा असा पूर्वी करार ठरला होता. तुकारामाच्या वह्या बुडविण्याच्या दोन्ही वेळेस हा हजर नव्हता असे दिसते. वाघोलीस व्याघ्रेश्वराजवळ देह ठेवण्याचे ठरल्यावर (तुकारामाच्या निर्याणानंतर) तुकोबाचा भाऊ कान्होबा सुदुंबरेस रहात होता त्यास वाघोलीचा बलुता पाठवून याने बोलावून घेतले.

गाईच्या प्रकरणापूर्वी मंबाजीने दम दिल्यापासून ही मंडळी महादजी कुलकर्ण्याचे घरी रहावयास गेली होती. तुकोबाशी संबंध येणाऱ्या व्यक्तीत महादजी कुलकर्णी, कोंडोपंत, रामेश्वर यांचीच ती नांवे घेते. मंबाजीचे शब्द ती सांगते—तुकोबा गोसावी शूद्रवाणी—कथा करीतसे देऊळी सर्वथा—द्विज त्याच्या पदा लागताती। आणखी बहिणा सांगते—रामेश्वर भट अतियोगी थोर । तेही नमस्कार त्यासी करिती। आणिकही एक स्त्री—पुरुष आहेती। तेही म्हणवीती शिष्य त्याचे।। म्हणविति ब्राह्मण आहेती सोनार। कुलकर्णीही फार मान्य केले।। तुकोबाचा पार वर्णीलसा कलियुगी जाण प्रल्हाद हा।। बहिणी म्हणे लोक बोलती सकळ। तुकोबा केवळ पांडुरंग।।






जयराम स्वामींनी तुकोबाचे रूपवर्णन व तत्वज्ञान इतके अचूक वर्णन करून वहिणाला सांगितले होते की, त्यावरून या दोघांचा चांगलाच सहवास असल्याचे दिसून येते. तुकाराम वेद वुडता जो देखसी। जळी ठाकलासी देखोनिया"

यावरून वह्या वुडविण्याचे वेळी कोणी तरी सज्जनाने पाण्यात उतरून त्या चटकन् काढून नेल्या व तेथे १३ दिवस तुकाराम धरणे धरून बसल्यानंतर त्याचे एका मुलाकरवी सांत्वन केले गेले व त्या मुलाने काढून घेतलेल्या वह्या त्यांना कोरड्या स्वरूपात परत केल्या. त्यांना व लोकांना तो मुलगा देवच वाटला. दामाजीला सोडविण्यासाठी वेदरच्या दरबारात गेलेल्या विठू महाराप्रमाणे.

तुकारामाच्या सहवासातील बहिणावाईचे अनुभव असे आहेत—

—तुकारामाचे कथाकीर्तन किंवा नामसंकीर्तन तिन्ही त्रिकाळ चाले व ते एकटेच देवापुढे ते करीत असत. टाळकऱ्यांचा मेळावा तिला दिसला नाही. ठायीच बैसोनी करा एकचित्त या प्रमाणे पुढील काळात तुकारामाने पंढरीची वारी सोडली असावी. ज्या देवळात तुकाराम हे नामसंकीर्तन चिंतन मनन करीत ते त्यांच्या आनंद वोवरी पलीकडील घरात होते. त्यामुळे बहिणाला देवाशी कीर्तन करता आले नाही. दाराबाहेर करावे लागले. तुकाराम कुटुंबासह स्वतःच्याच घरात शेवटपर्यंत रहात होते. तुकारामाच्या वायकोच्या कर्कशपणाबद्दलं बहिणाने काहीच लिहिलेले नाही. तुकाराम देवापुढे कीर्तन करू लागला की, त्याची काया ब्रह्म होत असे अशी त्या काळातील लोकांची समजूत होती. जयराम स्वामी व वहिणा तुकारामाचा तुकाराम म्हणूनच उल्लेख करतात. त्या अर्थी रामदासांनी तुकारामाचे तुकाराम असे नांव ठेविले ही दंतकथा काल्पनिक आहे. बहिणाबाई ही सुद्धा रामदासी होती असा प्रचार उत्तर पेशवाईत व नंतर रामदासी परंपरेच्या लेखकांनी केला आहे. भूतकाळ, वर्तमानकाळ आणि भविष्यकाळ यांतील सारेच साधुसंत रामदासांचे लोटांगणी आणावयाचे ही उत्तर पेशवाईतील रामदासी हरदासांची संवयच होऊन बसली होती.

तुकारामाचे कोणीही टाळकरी नव्हते. टाळकरी सांभाळून भजनाचा फड करणे ही कल्पना निळोवांच्या शिष्यापासून निर्माण झालेली आहे. तुकोबाचे हात लिहिताती जे जे। तेचि ते सहजे पांडुरंग याचा अर्थ त्यांचा कोणी लेखक नव्हता. बहिणाला आनंद वोवरीचे भक्तिसुख फार दिवस लाभले नाही—तुकारामा तव देखता देखत। आले अकस्मात मृत्युरूप।। नंतर तुकाराम कथा करावी ती द्वारी। ऐसा हा अंतरी हेत होता म्हणून तिने आपला रागीट भ्रतार कामानिमित्त पुण्यास गेल्याची संधि साधून बहिणी म्हणे तेथें पुसोनी मातेसी। क्रमियेल्या निशी तीन तेथें—बहिणी म्हणे हात घातला मस्तकी। देह तो या लोकी आढळेना।। तुकारामाच्या निर्याणानंतर जयरामस्वामी बहिणास पहावयास देहूस आले. आसनावर स्वस्थ बसले। तव काही एक अपूर्व वर्तले। तुकारामें दिधलें दर्शनासी—मज म्हणें—तुम्ही आतां येथें राहो नका!!! आत्मज्ञान बोधा न संडी वो। हा उपदेश साक्षात्कार होत असता तुकाराम पाहे परतोनी आपुलिया दिठी। सांगितली गोठी एक कानीं। तयाचा उच्चार करू नये वाचे। झालेसे चित्ताचे समाधान।

तुकाराम अकस्मात देहासह कसा नाहीसा झाला या जिज्ञासेच्या धक्याच्या चुटपुटीने तपासासाठीच खरोखर जयराम स्वामी देहूस आले होते. ते बहिणा जवळ सचित बसले. डोळे मिटून त्यांनी शोध घेतला आणि चटकन् त्यांना जे समजले ते त्यांनी बहिणाच्या कानात सांगितले—तुकारामाचा घात असा असा झाला—तयाचा उच्चार करू नये वाचें। अशा महान युगपुरुषाचा अशा नीच रीतीने वध झाला या गोष्टीचा उच्चार आपल्या सात्विक व श्रद्धाळू वाणीने करू नये असेही त्यांनी बहिणास सांगितले—आणि हेच जर त्यांनी सांगितले नसते तर वहिणाने इतर माहितीबरोबर या महात्म्याचा वध कसा करण्यात आला हेही अभंगात लिहून ठेविले असते. व तुकारामाच्या मृत्यूचा पुरावा म्हणून साऱ्या जगाला त्याचा उपयोग झाला असता पण तसे लिहिले गेले नाही. एकदा गोधडी, एकदा वीणा, एकदा टाळ अशी तुकारामाजवळ असलेली भजनाची साधनें देहू गांवात, कोणीतरी अचानक आणून टाकली—उद्देश असा की, तुकाराम आता या जगात नाही याची लोकांना खात्री पटावी. त्यावेळी तुकारामाची पत्नी जिजा विद्वान प्रमुख ब्राह्मण म्हणून रामेश्वर भटाला विचारावयास गेली की, तुकारामाचे पिण्ड श्राद्ध वगैरे करावयाचे आहे की काय त्यावेळी रामेश्वराने असे उत्तर दिले की, बाई तुझा नवरा सदेह स्वर्गाला गेलेला आहे. सामान्या-





प्रमाणे त्याचे पिण्ड श्राद्ध कशाला ! म्हणजे तुकाराम निश्चित मृत्यु पावला आहे व त्याचे शरीरहि नाहीसे झालेले आहे यावद्दल रामेश्वराची खात्री होती. त्यानेही स्वत: रचलेल्या अभंगात तुकारामाच्या मृत्यूची खरी मीमांसा देण्याचे टाळून तो सदेह स्वर्गाला गेल्याचेच सांगितलेले आहे.

तुकारामाचा नातु गोपाळबावा याने लिहिले आहे त्यात तुकारामाच्या मृत्यूनंतर त्याच्या मुलाशी मंबाजीने केलेला हलकटपणा लिहिला आहे—तुकारामाचा मुलगा नारायण एके दिनी इंद्रायणीचे करूनी स्नान। करावया श्रीमूर्तीचे पूजन। मार्गे आपण जात असता । तव भेटला ब्राह्मण। तुकयाचा द्वेष्टापूर्ण। मंबाजी जयाचे नामाभिधान। तो दुष्ट वचन बोलियेला।। म्हणे रे तुझा पिता कोठे गेला। नेणो भुताखेतांनी बोळुनी नेला। किंवा विदेशास जाऊनी मेला। घटस्फोट केला नसता पैं। अथवा उत्तर-क्रिया नाचरता। सुतकी हो विष्णुमूर्तीसी स्पर्शिता। ऐशा वाक्यानें कठोर ताडिता। हृदयी दुश्चिता भेदला।। तेणे नारायण शशां-किते। चित्ती होऊनी श्रीमूर्तीते। न स्पर्शता सन्निध तेथें। उगाचि ठाकत पैं उभा।। प्रथम श्रीमूर्तीच्या मुखे पाहे तव वचन ऐकिले नारायण हे। दुजे तुझा तुकोबा मजपाशी आहे। ऐकता होय समाधान ।। श्रीमूर्तीची पूजा करून। शीघ्र पातला नारायण। बंधु उभयता पाचारून आणिला धरून मंबाजी।। दुर्वास अंब-ऋषीते छळिता। की अश्वत्थामा पांडव पुत्रासी वधिता। देवे शिक्षा केली न साहता। तशीच तत्वता नारायणे।। नसतां अन्याय तिळ-भरी। त्यानें तुकयासी मारिले काठीवरी। ऐसे स्मरुनी शिक्षा केली भारी। दिल्हा ग्रामांतरी लावुनीया।

श्रद्धाळु सज्जन माणसे जरी तुकारामाच्या झालेल्या भयानक अंतावद्दल बोलावयाचे टाळीत होती तरी झालेल्या प्रकारावद्दल देहूतच नव्हे तर साऱ्या पंधरा वीस गांवात कुजकुज चाललेलीच होती. झालेल्या घटना इतक्या योजनावद्ध पाताळयंत्री होत्या की, ज्या षड्यंत्राने तुकाराम खाल्ला ते षड्यंत्री तुकारामाच्या कुटुंबातील मंडळीनाही खाणे शक्य होते हे ओळखून तुकारामाची बायको जिजाबाई आपल्या लहान मुलांना घेऊन माहेरी खेडला जाऊन राहिली. तुकारामाचा वडील भाऊ सावाजी अगोदरच वारला होता. आता धाकटा कान्होवा होता तो सदुंवरे येथे जाऊन राहिला त्यामुळे विठ्ठल टिके पडिक राहिले नंतर गांवकीने देवाची पूजा अर्चा करणाऱ्या मंबाजीस मूळ थळकऱ्याच्या संमतीने अर्धे टिके म्हणजे ७।। विघे दिले. मूळ थळकरी पंचमीड त्यांच्या-तर्फे पीलसेटी याजकडे राहिले. मंबाजीने शिवाजी महाराजांचे खूर्दखत अथवा दुमालापत्र मिळविले. २५ वर्षे देहू सोडून बाहेर-गांवी भीतीमुळे राहिल्यानंतर नारायण व त्याचे बंधु देहूस येऊन पुन्हा स्थिरस्थावर होण्याच्या प्रयत्नास लागले. आपली इनाम जमीन परत मिळावी म्हणून धडपड करू लागले. यावद्दल मंबाजीने सरकारात तक्रार केली. तेव्हा ग्रामाधिकाऱ्यास ताकीद पत्र आले—'त्याचे इनामास खलेल करावयास गरज काये आहे.' (१५ मार्च १६७५) पुढे हे भांडण म्हणजे आपल्या मिरासीचा कजिया समस्त गांवापुढे ठेवून मुलांनी निवाडा करून घेतला—

"श्री विठल–श्री सके १६०१ सिद्धार्थी नाम संवछरे वैशाख सुध पाडवा (१ एप्रिल १६७९ मंगळवार) ते दिवसी नारोबा गोसावी आंविले मौजे देहु यासी दादूजी कालोखे मोकदम व समस्त मौजे देहू पो।। पुणे, ता।। हवेली लेहून दिधले यैसे जे— तुमचा बाप कास खंडी १८– यक कसवपैकी मौजे मजकुरी मिरासी वडिलाच्या आहे. सेत व विहीर १ यक आहे. हे आपणास ठाउके आहे. त्यासी तुमचा दरम्याने भोगवटा खुटला होता. हाली तुम्ही मिरासदार उभे राहिलेस. तुमचे सेत व वाग तुमचे दुमाले केले असे. सु।। तिसा सवैन अलफ छ २९ माहे सफुर.

निवाडपत्र मिळविले तरी जमीन मिळणे कठीण होते कारण जमीन तहहयात इनाम दिली गेली होती.

देहू गांव तुकारामाच्या मुलांना न्याय देते परंतु वरची प्रांतिक-सत्ता मंबाजीकडून बोलते इतकेच नव्हे तर मुलांचे वंशपरंपरा इनाम मंबाजीच्या हवाली वंशपरंपरा करते याचा अर्थ इतका उघड आहे की, शिवाजीची व तुकारामाची ओळख नव्हती.

थोरले छत्रपति संभाजी राजे यांचे आज्ञापत्र—

श्री—स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ७ रौद्र संवछर भाद्रपद (शुध) पंचमी गुरुवार (१९ ऑगस्ट १६८०) क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति याणी राजश्री विनायक उमाजी देशाधि-कारी प्रांत पुणे यासी आज्ञा केली यैंजीजे . . . . . . . . . .

—महादाबा गोसावी तुकाबा गोसावी याचे पुत्र वस्ती मौजे देहू ता।। हवेली सुभे मजकूर यासी वर्षासनाची मोईन होन ,प।। (पातशाही) लुगडिया बद्दल गला जोरी बारुले माहाल मापे येक खंडी १ वेकून होन प।। एक व गला खंडी येक मोईन असे ते सा। मजकुरापासून सुभे मजकुरावरी देविली असे. दर हरसाल अदा करीत जाने. प्रती वरसी नवे सनदेची उजूर न करणे. तुम्ही तालिक लेहुनु घेउनु असल गोसावी यासी परतोन देणें.

सरकारी मोईन मिळाली पण विठलटिके शेत मात्र मिळाले नाही. १६९० चे सुमारास एक वर्ष मोईन मिळाली नाही तेव्हा देहूच्या मोकदमास आज्ञापत्र लिहिले गेले (१७ ऑक्टो. १६९०) त्यात मौजे मजकुरी श्री विठोवा देहू यांचा नंदादीप पूर्वीपासून चालत आला आहे त्याप्रमाणे हल्लीही चालविणे. याच बाबतीत रामचंद्र नीलकंठ आमात्याचेही २७ मार्च १७०० चे पत्र उपलब्ध झाले आहे. त्यातील महत्त्वाचा मजकूर—

श्री—अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री बालाजी विश्वनाथ सरसुभेदार व कारकून प्रांत पुणे गोसावी यासी सेवक रामचंद्र नीलकंठ आमात्य नमस्कार सुहूर सनमया व अलफ. श्री विठोबाचे देवालय मौजे देहू ता। हवेली प्रांत मजकूर' हे देवस्थान बहुत थोर जागृतिस्थान आहे. पूजेस व नंदादीप व नैवे-द्यास मोईन पेशजीपासून प्रतिवर्षी . . . . . . एकूण ६२ बासष्टी रुपये रास देविले आसे. श्रीचे पुजेस असतील त्यांपासी प्रविष्ट करणे. आणि नंदादीप आणि नैवेद्याच्या नांवें धर्मादाऊ खर्च लिहिणे उजूर न करणे ६९१६ सौवाल.




अनुक्रमणिका





मंबाजी वारल्यानंतर विठल टिकेची जमीन नारायण बाबाकडे आली परंतु मधेच चापसेटीच्या मुलांनी ती आपलीच आहे म्हणून वखेडा निर्माण केला. पहिला जामीन कतबा देहूच्या कुलकर्ण्याचा आहे तो—

(महालक्ष्मी थलात–चापटिके शेजारीच विठलटिके आहे)

"श्री—दर्या वै ।। मोकदम मौजे देहू ता।। हवेली प्रांत पुणे सु।। ११३० (इ. स. १७२०–२१) बंदगीस कतबा लेहून दिधला ऐसा जे –

विठलदेव आपला म्हणून त्याकरिता दिलेले इनामही आपले असा निवाडा समस्त गांवकऱ्याकडून नारायण बाबाने करून घेतला व नंतर सुभेदाराकडून पांढरीच्या मुखे करिना घेववून त्यांचे कडुनही आपण इनामदार खरे असे करून घेतल्याने सर्वांनाच सोडचिठ्ठचा लिहून देणे भाग पडले. दुसरा सेटियाचा लेख आहे—

—श्री—श्री शके १६४२ शारवरी नाम संवछरे श्री शुद्ध दशमी भोमवासर ते दिवसी (२ ऑ. १७२०) राजश्री नारोबा गोसावी वास्तव्य मौजे देहु, ता। हवेली प्रांत पुणे यासी सटवोजी व बालोजी बिन चापसेट सेटिये सा।. मौने मा।र सु।। सन —११३० कारणे लेहुन दिले यैसे जे—मौजे मारी श्री विठल देव आहे त्यास श्रीच्या उपभोगास इनाम आपली मिरासी पासी खंडी ९ नव आहे त्यापैकी विठल टिके कास मण ।ऽ।। साडेसात येकुन रुके 6= 'येकुण बिघे पंधरा कदीम आहेत त्यास तुमचे बाप श्री तुकोबा गोसावी सदरहु इनामाची कीर्दी करऊन उपैंद्र होये त्याचा खर्च श्रीच्या मोहोछावासी करीत असेती. दरम्यान किल्येक दिवस मंबाजी गोसावी ब्राह्मण इनामाचे खटपटेस तुकोबांनी ठेविले होते तेही कीर्दी करऊन तेथील उपैंद्र श्रीस भोगवटा घेत असेती ते उभयेताही निवर्तलिया. उपरी तुम्ही इनामात कीर्दी करऊन उपैंद्र होते ते श्रीस खर्च करीत आलात त्यास आपण तुम्हासी खटपट करू लागावे की आपल्या मिरासीच्या सेतात श्री—स इनाम नाही म्हणून राजश्रीपंत मुतालिक दि ।। राजश्रीपंत प्रधान याजमासी. तुम्ही व आम्ही उभे राहिलो त्यांचा मुकाम मौजे मारी जाला त्याणी करिणा समाकुल पांढरीच्या मुखे मनास आणिला. पांढरीच्या मुखे खरे खुरे जाले की विठल टिके श्रीस इनाम पुरातन आहे आपण कथला करतो तो हिसाबी नाही. या उपरि श्री—चे इनाम विठल टिके आपल्या नवखंडियाचे कासेत आहे ते तुम्ही कीर्दी करऊन सालाबाद करीत आला असा त्याप्रमाणे कीर्दी करऊन श्री—स उपभोग घेणे आपण अगर आपले भाउबंद कोणी विठल टिकी यासी कथले करून तरी गोताचे खोटे व दिवाणाचे गुन्हेगार हे लेहून दिल्हे–सही वि।। तागडी.

सही निशानी व गोहींच्या सह्या त्याच आहेत.

तिसऱ्या कतब्यातील मुख्य मजकूर—.....कारणे लेहून दिल्हे यैसे जे–तुमचा आजा पील सेठी त्याणे मौजेमारी महाराज श्री विठलदेव आहे त्याचे सेवेसी आगंतुक ब्राह्मण मंबाजी गोसावी होते त्यास तुम्ही आपल्या मिरासीच्या सिवगंगेचा (महालक्ष्मी वोहळाचा) टुकडा दिला होता की तेथे बाग वांधोन फुलझाडे करोन राहाणे त्यावरून मंबाजी गोसावियानी त्या टुकड्यात फुलझाडे लाविली होती. कित्येक दिवस त्याचा उपभोग घेत होते. मंबाजी गोसावी निवर्तलिया उपरी तुमचे टुकडे तुम्ही कीर्दी करवु लागलेत पुढेहि तुम्ही सिवगंगेचा टुकडा आहे तो कीर्दी करून खाणे आम्हास त्या सेताचा संबंध नाही. आपला कोणी आगर आपण काही कथले करून तरी गोताचे खोटे व दिवाणाचे गुन्हेगार मंबाजी गोसावी यासी पीलसेटीने कागद लेहून दिला होता तो आपणासी होता तो तुमचा तुम्हास फिराऊन दिल्हा असे हे लिहिले......

वरील साऱ्या लिखाणावरून लक्षात येईल की, संताच्या अमृतवाणीने शांति सुखात पहुडलेल्या देहू गांवावर मंबाजी नांवाचा महान विषारी खल प्रविष्ट झाला. तुकारामा करवी आपल्या पोटापाण्याची रहाण्याची सोय लावून घेऊन त्याच्याच विरुद्ध प्रांताधिकाऱ्याकडे गुप्तपणे मंबाजीने लेखी तक्रार केली तुकोबा शूद्रवाणी नवे कवित्व करतो त्यात श्रुतीचा अर्थ उमटतो व द्विज त्याच्या पाया पडतात हे राज्यावर संकट आहे तरी वेळीच त्याचा बंदोबस्त करणे. प्रांताधिकाऱ्यानेही काही विचार न करता वरती सरकारात अर्ज केला. कसलाहि अपराध नसताना तुकयाला मरे-मरेतो काठीखाली मंबाजीने बडविले. परगांवाहून आलेल्या बहिणाबाईसारख्या संतांना हुसकावून लावले दम दिला त्यांच्या गाईला चोरून कोंडून तीन दिवस सतत चोपले. सरकारकडून ताकीद आणून तुकारामाच्या वह्या डोहात बुडविल्या.

# दीपावली

## – कथा अंक –

म्हणजे 'केवळ' कथा अंक नव्हे !!

याने

'केवळ कथा दिल्या (कशा तरी) की झाले'

असे नव्हे !!

**कथा अंक हीही एक साधनाच !**

(असे आम्ही मानतो)

**– म्हणूनच –**

जीवनाच्या विविध अंगांना स्पर्श करून जाणाऱ्या, विविध भावनांचा आविष्कार करणाऱ्या प्रीतिकथेपासून तो भूतकथेपर्यंतच्या सर्व कथा यंदा **'दीपावली'** सादर करणार आहे.

पण

त्यासाठी **'दीपावली'**चा **जुलै १९६६** चा अंक पाहिला पाहिजे.

***जबाबदारी (पण गोड) वाढली !!***

*[ आमची आणि तुमचीही ]*

देहू गांव वेळोवेळी तुकारामाच्या बाजूने कौल देते. परंतु मंबाजी व सरकारातील कर्मठ वर्णश्रेष्ठ हे तुकारामाविरुद्ध सारख्या गुप्त हालचाली करतात याचाच अर्थ १५–१६ वर्षाच्या शिवाजीचा व तुकारामाचा परिचय नव्हता तो जर असता तर इतिहास निराळाच घडता. परंतु या झगड्यात जिथे जागतिक तोलामोलाच्या शिवाजीचीच आहुति पडली तिथे तुकारामाचीही पडावी अशीच जणु नियति होती. कायदेशीर व बेकायदेशीर रित्या जेवढे करता येईल तेवढे मंबाजीने केले व शेवटी शिरवळच्या अप्पाजी गोसाव्याकडून त्याला असा सल्ला मिळाला असावा की, शिमग्याच्या घाणेरड्या दिवसात दारू पाजून मांग किंवा गुंड आणून त्यांच्याकडून रात्री त्याला देहूतून हाकलून न्यावा. कोणच्या तरी आड मार्गात तोंडात बोळा देऊन दगडांनी ठेचून ठार करून प्रेत वाहत्या नदीत फेकून दिले असावे किंवा किल्ल्यांच्या भुयारात जी भयानक तळघरं मगरीसुसरीनी व पाण्याने भरलेली अथांग असतात त्यात फेकून दिले असावे. ग्रामाधिकारी वगैरे सरकारी लोकांचे यात अंग असल्यामुळे या गोष्टीची चौकशी झाली नाही. व ही खरी बातमी कळताच आपले इनाम सुद्धा सोडून तुकारामाची माणसे दाही दिशा सैरावैरा पळून गेली. मंबाजीला सरकारचे अंग असल्यामुळे तुकारामाच्या मृत्यूनंतर त्याला तुकारामाचे इनाम गिळता आले. व आपल्या बुवाबाजीच्या महंतीला भलता अवसर मिळाला. या घालमेलीत चापसेटी सारखे लोकही इनामाचे लचके तोडीत होते.

या लेखात सुरुवातीलाच सांगितल्याप्रमाणे बिदाग्या मिळविण्यासाठी हरदासांनी तुकारामाच्या चरित्रांत नाना रंग भरले व हवे तसे कृत्रिम अभंग रचले. आत्महत्या, स्वर्गाची–वैकुंठाची अभिलाषा या कल्पना तुकारामाच्या नव्हत. तुकारामाला एकादशी सारखी पुण्यतिथि मिळू नये म्हणून खलकुटिलांनी मुद्दाम शिमग्यासारख्या गलिच्छ दिवसात त्याला मारला.

> आम्ही जातो अमुच्या गांवा। अमुचा राम राम घ्यावा
> गरुडावरी बैसोनी येतो जगजेठी
> आता हे विनवणी प्रधान अष्टका।

जिथे अष्टप्रधानच १६७४ मध्ये अस्तित्वात आले राज्याभिषेकाच्या वेळी व तुकोबाचा अंत झालेला १६४९ साली व त्या पूर्वीचे हे अभंग, अर्थात ते कृत्रिम आहेत हे सांगावयास नको. १६३९ ते १६४९ या दहा वर्षांत तुकारामाची प्रतिभा झळाळत होती. या दहा वर्षांत शिवाजी ९ ते १९ वर्षाचा होता. सोळा वयापर्यंत शिवाजी दादोजी कोंडदेवाच्या सल्ल्याने वागे व १७ ते २५ वयापर्यंत शहाजीचा प्रतिनिधि म्हणून वागला. २६ वयापासून तो स्वतंत्रपणे वागला. तुकारामाच्या अभंगातील तत्वज्ञान हुडकून ज्याने त्याचा अभ्यास केला त्याला तुकारामाच्या नांवावर छापलेले हवे तेवढे अभंग ओळखता येतील. हे क्षेपक अभंग त्याच्या नांवावर छापणे ही त्या महापुरुषाची बदनामी आहे. सॉक्रेटिस, मीरा, येशू, महात्मा गांधी व इतर अनेक थोर संत साधू यांचे खून झाले. म्हणून त्यांची योग्यता कमी होत नाही. मात्र त्यांचे खून झालेले लपवून त्यावर अंधश्रद्धेचा लेप चढवणे याने मात्र त्यांची खरी नालस्ती आपण करीत आहोत हे ज्या दिवशी आम्हाला कळेल तो सुदिन. संतचरित्रावर भरलेले अनेक कल्पनांचे नाटकी रंग हे नाटकी रंगच आहेत हे विसरू नये.

तुकारामाच्या विठल देवाचे इनाम पुन्हा मिळविता मिळविता तुकारामाच्या मुलांच्या नाकी नव आले. शाहू महाराजांच्या दरबारात अनेक भक्त मंडळी जाऊन उभी राहिली व कीर्तन करता करता तुकोबा गोसावी अदृश्य जाहले ही गोष्ट सर्वश्रुत आहे हे पत्र त्यांच्या बरोबर नारायण बावांनी दिले तेव्हा श्री शाहू छत्रपतीनी सबंध देहू गांवच इनाम देऊन टाकला. तेव्हा जमिनीचे सारे कज्जेच खतम झाले. तुकाराम मृत्यूच्या भयानक प्रकाराने आता तुम्ही येथे राहू नका असा आतला आवाज सांगू लागल्यामुळे बहिणाबाई सारख्यांनीही देहू सोडले होते. जनतेच्या नजरेआड गुन्हेगारांनी घातपात करून गुप्तता स्वीकारलेली असते त्या वेळेस भुताखेतांनी किंवा खैसाने हे केले असे आजही खेड्यातील लोक बोलतात. तुकारामाच्या मुलांच्या जखमेवर मीठ चोळण्यासाठी मंबाजी असेच बोलला. खुनी माणसाचे हे उद्गार सूचक आहेत. दुसऱ्या गांवी भजनास नेण्यास म्हणून वारेकरी आले व तुकाराम गोधडी पांघरून वीणा टाळ घेऊन त्यांच्याबरोबर गेला.

●●●








त्या रात्रीं आवाज आला. मी दचकून उठलो. एक आकृति हलत होती. उरात भीति दाटून आली. भ....भ........भूत....म्हणून मी ओरडलो. आणि.......






–वि. रा. भाटकर

**आमच्या** घरात भूत शिरले होते त्या रात्री झालेल्या गोंधळाइतका गोंधळ (आमच्या आजोबांचा पलंग कोसळला ती रात्र सोडल्यास) आमच्या घरात अजून कधी झालेला नाही.

मी बाथरुममधून बाहेर आलो तेव्हा मला जिन्यावर पावले वाजलेली ऐकू आली. मी पुढे जाऊन वाकून पाहिले तो कुणी नाही. पावलांचा आवाज मी ऐकला होता यात काही वाद नव्हता.

मी वळून चालू लागलो तोच पुन्हा पावले वाजली. पुन्हा वळून मी पाहू लागलो तो कुणीहि नाही. मी गुपचूप खोलीत गेलो आणि श्रीला उठविले. मला पाहताच तो दचकून उठून बसला. (ते "बाबा आणि मीरा रोड" प्रकरण घडल्यापासून मला पाहताच घरातली माणसे पुष्कळदा दिवसासुद्धा दचकत असत. मग रात्री न दचकली तरच नवल.)

"काय रे ? काय हवंय तुला ?" त्याने विचारले. मला काही बोलताच येईना. भूत हा शब्दच माझ्या तोंडातून उमटेना. "भ–भ–भ–" मी म्हणालो, "भ–भ–भ–"

"भाईंदर," श्री भेदरलेल्या सशाप्रमाणे आकसून म्हणाला. "भाईंदर. 'मीरा रोड' पुढे 'भाईंदर' आहे आणि त्याच्या पुढे–"

"अं हं", मी मान हलवून म्हणालो, "ते नाही रे. जिन्यावर प–प–पावलांचा आवाज–"

"च–च– चोर ?" श्री म्हणाला. "द–द–दार लावून घे आधी."

"अं हं," मी म्हणालो." च–चोर नाही. भ–भ–" मी भूत असे ॲक्शन करून सुचवले.

"भ–भ–भ–भ–" श्री म्हणाला. आणि थरथर कापू लागला. आता खरा प्रकार त्याच्या लक्षात आला होता. तोहि माझ्याप्रमाणेंच चोरापेक्षा भुताला जास्त घाबरत असे. आता दार लावून घेण्यातहि काही अर्थ नव्हता. भूत बंद दारातून आत येऊ शकते हे त्याला माहीत होते.

(पूर्वी श्री भुतांना इतका घाबरत नसे. पण एकदा आम्ही कर्जतला मावशीकडे–हिलाच आम्ही शिटीमावशी असं म्हणतो, बरं का. म्हणजे तोंडात दोन बोटं घालून पुरुषांसारखी शिटी वाजवते ती–राहायला गेलो होतो. एकदा रात्री जेवल्यानंतर श्री नेहमीप्रमाणे परसांत आंचवायला गेला. तो तोंड धूत होता, तेवढ्यात कुणीतरी त्याच्या हातातून तांब्या हिसकावून घेतला, त्यांतले पाणी त्याच्या डोक्यावर ओतले आणि मग तांब्या टाकून देऊन ते (ते म्हणजे ते जे कुणी होते ते) पळून गेले. ( हे सर्व अर्थात श्रीने आम्हाला सकाळी शुद्धीवर आल्यानंतर सांगितले.)

हा प्रकार घडल्यापासून भूत म्हटले म्हणजे श्री थरथर कापू लागतो. त्याप्रमाणेच आताहि तो कापू लागला.

नेहमी खाली झोपणारी आई 'बरे नव्हते' म्हणून गेले चारपांच दिवस वरच झोपत असे. आम्ही विशेष गडबड केली नव्हती. पण कशी कोण जाणे, ती जागी झाली. आणि उठून आमच्या खोलीत आली.

"काय गडबड आहे रे ?" तिने विचारले. गडबड हा आमच्या आईचा आवडता शब्द. आम्ही गडबड केली नाही तरी ती 'काय गडबड आहे रे ?' असे आम्हाला विचारीत असे.

खरा प्रकार तिला सांगायची सोयच नव्हती. ती गोंधळप्रिय नव्हती ही गोष्ट खरी असली तरी एकदा गोंधळ घालण्यास तिने सुरुवात केली म्हणजे साऱ्या आळीला ती 'दे माय धरणी ठाय' करून सोडीत असे ही गोष्टहि तितकीच खरी होती. म्हणून मी गप्प बसलो. श्री अर्थातच बोलण्याच्या मनःस्थितीत नव्हता. डोक्यावर पडलेल्या थंड पाण्याची आठवण त्याच्या मनात अजून ताजी होती.

आम्ही गप्प बसलेलो पाहून आईने तर्क केला–"चोर !" आणि मी काही बोलण्यापूर्वीच, "हो चोरच ! अरे बघत काय बसलात ? पोलिसांना फोन कर ना." असे ती ओरडून म्हणाली. पण फोन खालच्या खोलीत होता. खाली कोण जाणार ?








## माझाच गुन्हा !

झिमझिम पाउस येतां दारीं
दुखून जातो मनांमनांतील
वाळवाळला कोंभ पुन्हा . . .
(माझाच गुन्हा ! )

ढगांत शिसवी चढतां गोपुर
घण घण घंटा नादुं लागतां
गहिंवर येतो, तोंच पुन्हां. . .
(माझाच गुन्हा ! )

शरदभ्रांतून तळपत येतां
गोड हवेसें ऊन घराशीं
तेंच लागते पिसें पुन्हा. . .
(माझाच गुन्हा ! )

—कुठेंहि कांहीं घडतां अपरुक
दाटुन येते दुःख उराशीं
माझें मजशीं उमगत ना. . .
(माझाच गुन्हा ! )

—अंबादास दिगंबर माडगूळकर

"चल, आपण खाली जाऊन पोलिसांना फोन करू या," मी श्रीला म्हणालो.

"न—नको ! त–त–तूंच जा," तो म्हणाला, "मी इकडे आईजवळ थांबतो. ती घ—घाबरलेली दिसत्येय."

तेवढ्यात आईला एक युक्ति सुचली. शेजारच्या घरात राहणाऱ्या गुजराथ्यां-कडेहि फोन होता. आईने एक बूट उचलला आणि खिडकीतून त्या घराच्या रोखाने भिरकावला. तो खिडकीतून आत जाण्या-ऐवजी वरच्या तावदानावर बसला आणि ते खळ्कन् फुटले. पाणीना माठला अँन्ड कंपनी धडपडतच उठली.

"आ सूं तरास छे !" तो बोंबलू लागला. "आ बाजूनां घरा जेवा माणस आखी दुनियामा बीजा कईपण नथी मळसे. पेला तो खाली शाउटिंग करता हता. आवे तो कांच फोडी नाखी. आ घर वेचीने बीजा घरमां रेहवा जावू पडसे आपडे, " असे काहीतरी बडबडतच त्याने दिवा लावला.

"घरात चोर शिरले आहेत. पोलि-सना फोन करशो जल्दी," असे आईने त्याला ओरडून सांगितले. चोर 'त्यांच्या' घरात शिरलेले नसून 'आमच्या' घरात शिरले आहेत हें त्याला समजावून सांग-ण्यात बराच वेळ गेला. खरा प्रकार समजताच जिवात जीव येऊन त्यांनी पोलीस स्टेशनला फोन केला. श्रीकान्तने दुसरा बूट उचलला व तो तो दुसऱ्या खिडकीच्या रोखाने फेकणार होता. याची अर्थत काहीच गरज नव्हती. मी त्याला तसे सांगितले. पण तो म्हणाला, "खिड-कीतून बूट फेकून कांच फोडण्यात काही और मजा आहे. फोडतो आणखी एक कांच !" मी त्याला त्या विचारापासून परावृत्त केले.

थोड्याच वेळात तीन सब्–इन्स्पेक्टर व नऊ दहा पोलीस भरून एक लॉरी आली. "दार खोलो" असे म्हणत त्यांनी दारावर धक्के मारण्यास सुरुवात केली. दार उघडण्यास खाली कुणी जावे हे ठरत नसल्यामुळें बराच वेळ आम्ही वरच होतो. त्यामुळे संशय येऊन त्यांनी दाराला जोर जोराने धक्के मारून आतील कड्या निखळून पाडल्या व ते आत शिरले. त्यांच्या हातातील विजे-ऱ्यांचे झोत खोलीत इकडे तिकडे फिरू लागले. मी जिन्याच्या वरच्या बाजूला उभा होतो. माझ्या अंगावर विजेरीचा झोत टाकून एका पोलिसाने विचारले "कौन है तुम ?"

"मी इथे राहतो," मी म्हणालो.

"मग तुम्हाला काय होतंय ?" त्याने विचारले. "उकाडतंय काय ? कमरेला नुसतंच फडकं गुंडाळून उभे आहात ते ?"

मी मुकाट्याने खोलीत जाऊन हाताला आला तो लेंगा चढवला. बाहेर येताच एका सब् इन्स्पेक्टरने माझ्या कुशीत रिव्हॉल्व्हरचे टोक खुपसले. "कौन है तुम ?" त्याने दरडावून विचारले.

"मी इथे राहतो." मी म्हणालो.

पोलीस साऱ्या घरभर फिरत होते. चोरांचा मागमूस त्यांना कुठे दिसेना. त्यांनी खुर्च्या, टेबले, इकडची तिकडे करून टाकली. कपाटे उघडून त्यातील सामान, कपडे उस्कटून टाकले. एका कपाटात एका पोलिसाला एक रंगीबेरंगी फडके सापडले. त्याविषयी जिज्ञासा वाटून त्याने मला विचारले, "हे काय आहे ?"

"तो आमच्या इंदिरा मावशीचा बिछाना आहे," मी म्हणालो. (आमच्या घरी पूर्वी पाळलेल्या मांजरीचे नांव आम्ही इंदिरा असे ठेवले होते. तिला आम्ही इंदिरा मावशी म्हणत असू. त्या रंगीबेरंगी फडक्याशिवाय इतर कशावरच ती झोपत नसे.) हे उत्तर वास्तविक मी द्यायला नको होते. त्या पोलिसाने माझ्या-कडे, गाडीत आपल्या समोर बसलेल्या माणसाने खिशातून अंडे काढून तोंडात टाकले आणि ते गप्कन् गिळले तर आपण त्याच्याकडे जसे पाहू तसे बराच वेळ पाहिले. मग तो पुन्हा शोधाशोध करू लागला.

बराच वेळ त्यांनी शोधाशोध केली. त्यांची खेप फुकट गेली होती. कुणाला तरी पकडायला पाहिजे होते. एकंदर प्रकाराचा त्यांना संशय येऊ लागला. (ते साहजिकच होते म्हणा ! ) शेवटी एका सब् इन्स्पेक्टरने मला विचारले, "काय राव ? काय भानगड आहे ही ?

मी म्हणालो, "खरं सांगू ? आमच्या घरात भूत शिरलं होतं."

हे मुद्दा मी बोलायला नको होतं. त्या रात्री खरं म्हणजे मी काहीच बोला-यला नको होतं. माझं उत्तर ऐकून वज-नाच्या यंत्रात दहा पैसे टाकल्यानंतर वजनाचं तिकीट न आल्यास आपण त्या यंत्राकडे जसे पाहतो तसे त्याने माझ्याकडे पाहिले. बराच वेळ टक लावून पाहिले. मग त्याने नजर फिरविली.

हा सारा गोंधळ चालू असता आता आजोबाना 'जाग' आली. पलंगावर (कोस-ळला तो हाच पलंग बरं का) ते या कुशीवरून त्या कुशीवर वळताच कर्र कर्र असा आवाज बाहेर ऐकूं आला.

"हा कसला आवाज ?" एका पोलिसाने विचारले. पण आम्ही त्यांना काही सांगण्यापूर्वीच ते आजोबांच्या खोलीकडे धांवले. त्यांनी असे आधी न सांगता आजोबांच्या खोलीत घुसणे योग्य नव्हते. "पांच वारी फडकी गुंडाळून गांवभर फिरतात 'सटव्या !" आणि "कृष्णा, बेट्या मजा आहे तुझी !–" ही त्यांची पालुपदे जाऊन "पळून आले साले ! भ्याड लेकाचे !! नादान !!!" असे ते हल्ली बडबडत असत. सुभाषचंद्र बोसांच्या सैन्याने माघार घेतली आहे आणि ते पळून परत हिंदुस्थानात आले आहेत. अशा संभ्रमात ते आजकाल वावरत असत.

पोलीस त्यांच्या खोलीत घुसताच ते पलंगावरून ताडकन् खाली उतरले. सुभाषचंद्रांच्या सैन्यातीलच हे लोक आहेत आणि आपल्या खोलीत लपून बसण्यासाठी ते आले आहेत असा त्यांचा समज झाला. "चालते व्हा. चालते व्हा इथून. जा परत लढायला. भ्याड ! नादान कुठले !!" असे ओरडण्यास त्यांनी सुरुवात केली. हा कुणी बाहेरचा असामी नसून घरातीलच माणूस आहे हे पोलिसांना इतक्या वेळात कळून आले होते. परंतु ते खोलीतून बाहेर पडण्यापूर्वीच आजोबा त्यांच्यावर चाल करून गेले व हाताची मूठ वळून त्यांनी एका सब्-इन्स्पेक्टरच्या थोबाडावर एक ठोसा लगावला. तो कोलमडून पडताच त्यांनी त्याच्या हातांतील रिव्हॉल्व्हर काढून घेतले आणि एक बार काढला. गोळी एका पोलिसाच्या खांद्याला चाटून गेली. सगळे कसेबसे बाहेर पळाले व त्यांनी खोलीचे दार घट्ट लावून घेतले. त्यानंतरहि पिस्तुलाचे दोन बार झाले व कांचा फुटल्याचा आवाज ऐकूं आला.

"ते आमचे आजोबा होते," मी पोलिसांना म्हणालो. "तुम्ही सुभाषचंद्राच्या सैन्यातून पळून आलेले सैनिक आहात असा त्यांचा समज झाला."

"शक्य आहे ! आम्हाला सुद्धा तसंच वाटतं." तो ठोसा खाल्लेला इन्स्पेक्टर म्हणाला. "सकाळी येऊन मला माझं रिव्हॉल्व्हर त्या थेरड्याकडून परत घेतलं पाहिजे."

"खरं आहे," दुसरा इन्स्पेक्टर म्हणाला, "खरं आहे ! तुलाच ते परत घेतलं पाहिजे –दुसरा कोण घेणार ?" सकाळी मी ते रिव्हॉल्व्हर परत आणून देईन असे मी त्यांना सांगितले.

सकाळी चहाचे वेळी रात्रीच्या प्रकाराचा उल्लेख सालाबादप्रमाणे कुणीच केला नाही. चहा पिऊन झाल्यावर आजोबा मात्र म्हणाले.

"रात्री गडबड कसली चालली होती ? ते साले पोलीस लोक सगळ्या घरभर कशाला फिरत होते ?"

सालाबादप्रमाणे आम्ही काहीच बोललो नाही.

काय बोलणार ?

●●●




# लय

**दिवाळीचा पाडवा! फेरूच्या संसाराचा दीस ! त्याच्या आयुष्यातला 'पाक' दीस ! अंगातून चेतना सळसळते. पायात नुपूर नाचू लागतात. उरात आक्रांत दाटतो—नकळत साधून जाते——असामान्य लय !!**



—प्रभाकर पुराणिक

**कमळाच्या** पानावरचा पाण्याचा थेंब ! तो थेंब हिरव्या पानाच्या वैभवात दिमाखानं चमकतो. पण तो पाणीदार आहे म्हणून त्याला मोती म्हणता येत नाही. तो ओला आहे म्हणून त्याला अश्रू म्हणता येत नाही. त्याला काहीच म्हणता येत नाही म्हणून हळहळ वाटते. वाऱ्यानं हलणाऱ्या डोलत्या पानावरून घरंगळून गेला की, पंकापोटी त्याचं अस्तित्व. पानावर त्याची खूण नाही. ओलंपण नाही. क्षणाची त्याची उत्पत्ती, क्षणाची स्थिति आणि क्षणातच लय. त्या दुबळ्या थेंबात कुठं रुजायची भावना नाही. रुजलेलं वाढवायची कुवत नाही. अशासाठी कुणी हळहळायचं ? पण त्याला क्षणभर का होईना जगायचं असतं. अन् तो जगतो. पानावरचा क्षणाचा हिरवा संसार करून जगतो. हिरव्या पानाचं वैभव वाढवून जगतो. पानावरच्या शिरातून लय निर्माण करीत जगतो.

नागनाल्याच्या काठावर उंच उंच झाडाच्या तळाशी गोंडांच्या पांचपन्नास झोपड्या आपापल्या कलाकुसरीनं निकोप दारिद्र्याच्या विभवात उभ्या आहेत. त्याच झोपड्यांच्या कोपऱ्यावर एक झोपडी आहे. त्या झोपडीची नक्की खूण पटवायची असेल तर त्या पुढचं शेवग्याच्या शेंगाचं वांझोटं झाड शोधत










अनुक्रमणिका

जावं लागतं. तिथंच, त्याच झोपडीत थेंबाच्या जातीचा एक माणूस राहातो.

अवसेच्या पूर्ण अंधारातून उगवतीच्या सूर्याचा पहिला किरण झोपडीतून आत येतो. फेरूला जाग येते. दिवाळीच्या पाडव्याचा हा पहिला किरण त्याला एकदम पाक वाटायला लागतं. कारण आजच्या किरणाला, आजच्या दिवसाला त्याच्या मनात फार वेगळा अर्थ असतो. वेगळा उत्साह असतो. हा दिवस त्याचा असतो. त्याच्या संसाराचा दिवस असतो. सालाभरात उराशी बाळगलेल्या अटकळी पूर्ण करायचा दिवस असतो.

फेरूच्या अंगात नवतीची सळसळ असते. तो आरशात बघून आपले लांब कुरळे केस मधोमध भांग पाडून दुभागून विंचरतो. आगपेटीच्या काडीनं दोन्ही भिवयांच्या मध्ये ओलं कुंकू टेकवतो. डोळ्यात काजळ घातलं जातं नि धोतराचा सोगा चोपून चापून वसवल्यावर झोपडीच्या दाराला कडी घालून बाहेर निघतो. रस्त्यानं जाताना डोळ्याच्या कोपऱ्यातून ह्याच्या त्याच्यावर सांडणारी नजर आज मात्र भुईचा ठाव घेत सरळ असते. चालता चालता डाव्या कमरेवरची धोतराची फनगडी डाव्या हातानं धरून सोडण्याचा चाळा चालूच असतो. नाना धोब्याच्या दुकानातून एक भरगोस शीळ ऐकू येते. निंब्या न्हाव्याच्या दुकानात बसलेला दत्त्या बसल्या खुर्चीहून विनाकारण ख्या ऽऽहाँ—करून खूण देतो. कडेला बसलेली संत्रेवाली त्याला बघून शेजारणीकडं बघून दातात पदर घेते. पण या सगळ्या खुणावण्याला फेरूकडून कोणताच प्रतिसाद मिळत नाही. खुणा येत असतात. फेरू चालत असतो.

तो एका जाळीच्या घरापाशी येऊन थांबतो.

"बाबुजी!"

"कोण रे—"

"मी फेरू होव जी."

असं म्हटल्यावर तो स्वतःच लाजतो. किंचित् हसतो. उजवा हात तिथल्या तिथं कमरेजवळ आळवतो. कमरेला आपोआप लचक मिळत नि नितंब कमरेबरोबर किंचित् डोलतात. डाव्या हाताची करंगळी दातात दाबून रिकाम्या दाराकडे बाबुजीच्या येण्याला डोळे लावतो. त्याला काहीतरी म्हणायचं असतं म्हणून तो मनातल्या मनात तयारी करतो. बाबुजी येतात. दातातली करंगळी निघते व तळवा गालावर टेकतो. दृष्टि कोपऱ्यातून धरणीचा ठाव घेऊ लागते. काजळी खोबणीतले काळेशार डोळे मेघांचे लोळ हलावेत तसे हलतात. फेरू गालावरचा हात केसांवरून फिरवतो. मानेला झटका मिळतो आणि केस मागं सारले जातात.

"कसं फेरू–कसं काय येणं झालं?"

"काम होतं जी तुमच्या कडं."

"माझ्या कडं! कोणतं काम बाबा..."

"अंऽऽऽ–त मले—"

"अरे बोल ना लाजतो काय, बायकोसारखा."

"हत्त माय्—तुमी चालले का माही मजाक कराले?"

"बरं मजाक नाही–सांग."

"बाबुजी—मले—अज संसार कराचा जी."

"आज!"

"हाव."

"अन् संसार!"

"अज पाडवा हाय ना जी. दिवारीचा पाडवा. त अजच्या दिसी बायको नवऱ्याची पुंजा करते."

"मग."

"त मले संसार कराचा अज."

"अरे पण तुला ना बायको ना पोर–जिवाला कसचा घोर?"

"तसं न्हाइ जी. पर माह मन्नं का—"

"काय?"

"का मले रुपये पांच द्या जा. उंद्याले सानच्या पाह्यरं वापसी भेट्टीन तुमाले."

"पण."

"बाबुजी–उंद्या देइन म्हनलं त मंग–एक डाव सांगतो बाबुजी का हे फेरूची जबान होय बस!"

फेरूचा शब्द मात्र पक्का. शब्द वांझोटा नव्हता. तो फळायचा याबद्दल शंका नाही. बाबुजी पैसे देतात आणि फेरू कनवटीला खोचत रामराम करून जाऊ लागतो. पुन्हा त्या काळ्या डोळ्यात खूप दिल्याचे आणि खूप घेतल्याचे भाव असतात. बाबुजीला वाटतं–रुपये फक्त पांच अन् त्यात ह्याचा संसार होणार. कशाचा संसार—कुणाचा संसार—कुणासाठी–कुणाबरोबर? न कळत्या मनानं बाबुजी त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे बघत होते. तीच लकब, कमरेत तीच लचक, हाताचं तेच वेळावणं, डोईवर घडा असणाऱ्या पाणवठ्यावरच्या राधेचं तोलून मापून चालणं. त्याची आकृति दाराची चौकट पार करते.

बाबुजीकडून निघाल्यावर फेरू आपल्या चालीनं रस्त्यानं जाऊ लागतो. मघाचेच आवाज–मघाच्याच शिट्या. तशाच नजरा आणि तसलंच खुणावणं चाललेलं असतं. एरव्ही त्यानं कुणाच्या तरी गालाला हात लावला असता. कुणाच्या तरी चेहऱ्या वरून हात फिरवून स्वतःच्या कानशीलावर काड्काड् बोटं मोडून घेतली असती. एखाद्या शेठजीच्या दाढीला हात लावला असता, शेठजी शहारल्याचं बघून आणखी लगट केली असती, नि एखादा रुपया सहज उचलला असता. पण आज त्याला तसं काहीच करायचं नव्हतं. आज फेरू व्रतस्थ होता.

त्याला संसार करायचा असतो. लोक जन्मापासून मरणापर्यन्त संसार करतात. संसार असार होईपर्यन्त संसार करतात. खूप लांब आणि कंटाळवाणा फेरूचा संसार असतो वर्षांतून एका दिवसाचा. पण त्या एका दिवसातल्या संसारात अपार ओढ असते.

समोरच्या फुलाच्या दुकानातून सत्तू माळी त्याला हाक मारतो.

"ये गाऽ फेरू. अज सक्कार वक्कार कोठं?"

"सत्तूभाऊ, मले अज दो हार अन यक येनी देशीन काय?"

"देथो पन जरासा—"

"नाइ भाऊ येथच बेस हावो."






अबे त येना येथी दूर दूर काहून परतस गा?"

फेरू आढे वेढे घेत त्याच्या जवळ जाऊं लागतो. जाता जाता त्याचा हलता हात तिथं बसलेल्या एका टारगटाला लागतो–

"दूर होय बे! लमचं कसच का वाट्टे."

त्याची ही नेहमीची बिदागी आहे. असं त्याला नेहमी सोसावं लागतं पण हे त्याच्या वळणदार अंगाच्या अंगवळणी पडलं आहे. त्याला खेद नाही.

"त सत्तू दादा, देतं काय?"

"देत्तो त म्हनलं."

"त मंग कित्तीक पैशे?"

"तुह्या पास्नं अन् पैशे का बे? पैशे गियशे नाइ पायजे–कइ बी सांजच्यान येऊन जा ना बे."

"पर अज मले संसार कराचा सत्तू-भाऊ."

"हाव बेटं! अज त पाडवा."

सत्तू तसा कसाहि असला तरी फेरुच्या म्हणण्याला मान देण्याइतका भाविक आहे. तो आपल्या हातानं हार–वेणी बांधून देतो नि देता देता हळूच त्याच्या गालाला स्पर्श करतो. पण नेहमी लाजणारा फेरू आज लाजत नाही.

इथून झाली सुरुवात फेरूच्या संसाराची जमवा–जमव करायला.

दुपारी रस्ता गप असतो. दुकानात गिऱ्हाईकांची गर्दी नसल्यानं लखनमल मारवाड्याला इकडं तिकडं नजर फिरवून सडकेची माणसं बघायला सवड मिळते. जागेवर बसून बसून डोळे पेंगू लागतात. नि गालात पानाचा तोबरा चघळत आपल्या स्थूल देहाची संथ हालचाल करीत स्वस्थ बसला असतो. फेरूला दुकानाकडे येताना बघून खुटकन डोळे ताणले जातात आणि पचाक्कन गुळणी थुंकून प्रथम हसतो.

"का वे फेऱ्या–कह्या जा रहा?

"तुमच्या येथीच आलतो जी."

"क्यो ऽ!"

"अज—"

"हा हा... अबे भुऱ्या, थ्या शिध्याच्या दुकानांत जाय. श्याले माहे नांव सांग आनऽ यक हिवरा लुगडा घेऊन ये. सोरा हाती वे."

लखनमलकडून सालीना एक हिरवं लुगडं आणि हिरवा चुडा आंदण मिळतो. ते त्याच्याकडे लागलेल आहे. वर्षभर तो शेठजीची सेवा करतो त्याची ही बिदागी. त्याच्या संसाराला मिळालेला हातभार. फेरूच्या हाती ते वाण देताना तो म्हणतो—

"फेऱ्या, आं–हा हाऽऽ! रंग जमना चाहिये."

"शेठजी आपल्याच भरोशावर माहा सनसार."

तो जाऊ लागतो. शेठजी पुन्हा त्याला हांक मारतो.

"इकडं ये."

"जी!"

"हं त मंग कसं?"

"न्हाइ शेटजी, अज मले पाक न्हायलं पाह्यजे."

"बरं–बरं जाय—अरे तोरी नज-रियाऽऽऽ!"

फेरू जाऊ लागतो. तो बोळी आड होई-पर्यन्त लखनमल त्याच्याकडे बघू लागतो.

फेरूच्या संसाराची वाटचाल इथून सुरू होते. त्याला आज आगळ्या पथा-वरून जावं लागतं. त्याला लागणारं पाथेय त्याच्या बरोबर असतं.

दिवे लागणीची वेळ असते. घराघरा-वर प्रकाशाची थेंबं सांडली असतात. जगाला पुन्हां रात्रीची जाग येते. दुपार-भर भरल्या पोटानं कुठं तरी दडून पडलेलं जग पुन्हा रस्त्यातून वाहू लागतं. आकाश वाणाच्या प्रकाशरेषेनं आपला आनंद स्वर्गी पोहोचवतं. भुईचक्रासारखं जग चौखूर उधळायला निघतं. आणि हा सगळा आनंद उंच असलेली आकाशदीपा गृहिणीच्या तृप्तीनं बघत असते.

गोंडवाड्यात मात्र दिव्यांपेक्षा अंधा-रच जास्त असतो. सगळे गोंड कळकट कोरी वस्त्रं घालून एकमेकांशी आपल्या खड्या बोलीत बोलत असतात. सगळ्यांची नजर मात्र मधून मधून बंद असणाऱ्या दाराकडे जाते. आत फेरूचा 'शृंगार' चालला असतो. गोंडांच्या सगळ्या बाया त्याला न्हाऊ माखू घालतात. अंगाला तेल लावतात, उटणं लावतात. सुवासिक द्रव्यांनी मार्जन होतं. हळूच दार उघडलं जातं आणि करवल्यांनी नवरीला बाहेर बोहोल्यावर आणावं तसं दोन तीन बाया त्याला धरून आणतात.

अंगावर नवं कोरं हिरवं लुगडं, हिरवी चोळी, हिरव्या बांगड्या आणि कपाळ भरून लाल कुंकवाचा मळवट. गळ्यात हार, हातात गजरे अन् डोक्यात वेणी. पायात घुंगरू असतात. एक बाई हळूच त्याच्या डोक्यावर पदर देते. डोळ्यात सुहासिनीचं तेज असतं. काजळकडावर तरळणाऱ्या पाणरेषेला थरथर असते. पाया-तली घुंगरं लयीकरता आसुसले असतात.

हळद गेरूनं रंगलेल्या दाराच्या चौक-टीत फेरू सौभाग्यखुणांसह उभा असतो. तितक्यात त्या गोंड मंडळीतला एक म्हातारा फेरूच्या तोंडाजवळ कशानं तरी भरलेला कांचेचा पेला नेतो. त्याला संजीवन मिळाल्यासारखं वाटतं. क्षणी झाडांचे श्वास थांबतात. आभाळ थांबल्या-सारखं होतं. माणसांची शरीरं ताठ उभी असतात. पण आतल्या नसातून गरम प्रवाह अगतिकतेनं वाहात असतो. मन-गटावर बांधलेल्या घुंगरांची आपोआप खुळखुळ झाल्यासारखी वाटते. हाता-तल्या दांडक्याभोवती मूठ पक्की आव-ळली जाते. झोपडी पुढल्या अंगणात काढ-लेल्या रांगोळीवर फेरूचं घुंगरू बांधलेलं










अनुक्रमणिका

पाऊल पडतं. पिपाणी वाजवणाऱ्यांचे डोळे मोठे होतात. तिच्या गोल कातडचाला तोंड गच्च आवळून वसतं. गळ्याच्या शीरा ताणल्या जातात आणि एक दीर्घ कर्कश्श स्वर वातावरण भेदून टाकतो.

जमलेल्या सगळ्या माणसांच्या डोक्यात लयीचं वारं भरारतं. त्याच्या काळ्याशार भोळ्या चेहऱ्यावर रानटी सुरावटीची मस्त धुंदी प्रकाशते. साऱ्यांची पावलं लय उचलतात, आणि अंधार हादरून टाकणारं तांडव सुरू होतं. प्रत्येकाच्या शरीरात प्रचंड शक्ती विजेच्या तडफेनं नाचत असते. पिपाणीची कर्कश्श लय वाढते. ढोलकं वाजतं. ताशाचं तरारणं वाढतं. नि फेरू उर्ध्व लागल्यासारखा बेहोष होऊन नाचू लागतो. बाकी फेर धरतात आणि श्वासाच्या शेवटापर्यन्त ओरडून नाचाचं रिंगण वाढवतात.

त्या वेड्या संगीताची जातच वेगळी आहे. त्यांत लालित्य नसलं तरी लय आहे. पायात घुंगरू बांधायचे. कर्कश्श वाटणाऱ्या पिपाणीच्या लहरी आंगभर भरून व्यायच्या. सारी शक्ति पायात आणायची, घुंगरांना वाचा फोडायची आणि पायाखालची प्रिथिवी मोहरून टाकायची.

कुणी तरी बाई व्हायचं. कुणी तरी दादला व्हायचं अन् संसार करायचा.

फुललेल्या रस्त्यांतून हे वऱ्हाड जात असतं. पुढें वाजंत्री असते. त्याच्या मागं ग्यासबत्तीच्या उजेडांत वेदरकारपणे पायांना ढोलकीच्या तालावर नाचवत असतो. त्याच्या अंगविक्षेपाचे अर्थ त्या गतीत बुडणाऱ्यांनाच कळतात. पावलं मधेच घोटाळतात नि पुढे जाऊ लागतात. मनात कुठं तरी जाण्याची आस धरून सुरांना साद देत वाजंत्रीवाल्याची दाद घेत ही फेरूच्या संसाराची मांदियाळी जात असते.

यात्रेचा शेवट बाबूजीच्या घरासमोर होतो. नाच सुरूच असतो. बाबुजी बाहेर येतात. नाचाची गति वाढते नि त्यांच्याहि पावलांना ताल मिळतो. नाचणाऱ्यांच्या पावलातली लय आपल्याहि पावलांत यावी आणि मदहोष होऊन रिंगण गाठावं असं त्यांना वाटून जातं. ते खिशांतून कलदार बंदा रुपया काढतात आणि त्या म्हाताऱ्या म्होरक्याच्या हातांत देतात. म्हातारा तो रुपया घेतो आणि फेरूवरून ओवाळून पिपाणीवाल्याच्या झोळीत टाकून पुन्हा रिंगण गाठतो.

फेरूच्या अंगात स्वर भरले असतात. क्षणभर वाजंत्री थांबते. फेरू किनऱ्या आवाजात गाणं म्हणतो—

नको रे संसार नको रे सैय्या
लवकरी विधवा करी ना भैय्या
जायाचं मले दूर गा ऽऽऽ!

शेवटचा शब्द विरतो न विरतो तोच इतर माणसं स्वर उचलतात आणि होऽऽऽ म्हणतात.

इतक्या व्यथेनं की ती हाक निळ्या अस्माना पार असणाऱ्या कुणाला तरी ऐकू जावी ! ● ● ●












# औषध ~~हलवून~~ तपासून घ्या

# डॉ. पिटॉट



**हल्ली डॉक्टर आणि भानगड हे एक समीकरण होऊन बसलं आहे. डॉ. लागू काय, वैद्य हसबनीस काय किंवा अलिकडचा डॉ. वॉड काय–हे सगळे प्रसिद्ध पावले ते त्यांच्या भानगडींमुळे ! ह्या भानगडींमुळे आज अशी वेळ येऊन ठेपली आहे की औषध हलवून घेण्यापेक्षाहि तपासून घ्यावं लागतं ! परंतु भानगडी करणे हा काही डॉक्टरांचा पूर्वापार चालत आलेला 'धंदा' आहे. आज त्याला प्रसिद्धी मिळते इतकंच. इंग्लंड–अमेरिकेत काही डॉक्टरांनी ह्या धंद्यात लाखो रुपये कमावले. त्यांची करणी ही कसाब करणी ठरावी. त्यांच्यापुढे लागू–हसबनीस थिटे ठरावेत ! अशा आठ प्रसिद्ध डॉक्टरांपैकी हा एक—**

—शर्विलक

**डॉक्टर** जेव्हा एखाद्याचा मुद्दाम खून करतो तेव्हा त्याच्या हाती कोणतं तरी घबाड लागायचं असतं म्हणून ! परंतु डॉ. मार्सेल पिटॉटने मात्र डॉक्टरकीचा व्यवसाय सुरू केला होता तो एकामागून एक अनेक खून करणं सोपं जावं म्हणून. जेणेकरून त्याच्या संपत्तीत निश्चितच भर पडत होती.

१८९७ साली त्याचा जन्म झाला. दुसऱ्या महायुद्धात जर्मनांनी जेव्हा फ्रान्स हस्तगत केला होता त्यावेळी डॉ. पिटॉटची चलती सुरू झाली. डॉक्टरी व्यवसायात त्याने कसे पदार्पण केले ? हे बघणंही मोठं मजेशीर ठरेल. वयाच्या तेराव्या वर्षी हा अनाथ झाला पण गरीबीची कुठलीही झळ त्याला लागली नाही. एवढंच नाही तर वयाच्या १९ व्या वर्षी जेव्हा त्याने वैद्यक शास्त्र शिकण्याचे ठरविले तेव्हाही पैशाची चणचण अशी त्याला भासली नाही. लोकांच्या कुठल्याही मदतीशिवाय तो शिक्षण घेत होता. अनुभवासाठी जेव्हा त्याला हॉस्पिटलमध्ये दाखल करण्यात आले तेव्हा हॉस्पिटलच्या अधिकाऱ्यांनी त्याच्या संबंधीची माहिती गोळा केली; परंतु वयाच्या १६ व्या वर्षी मार्सेल पत्र–पेटचा फोडीत असे ह्या गोष्टीकडे त्यांनी दुर्लक्ष केले.

पहिल्या महायुद्धात त्याला युद्धावर बोलाविण्यात आलं. त्यावेळी त्याला हॉस्पिटलचे अगदी जुजबी ज्ञान होते म्हणून त्याला साधारण प्रतीची कामं देण्यात येत होती. परंतु त्यामुळे त्याच्या वैद्यकीय ज्ञानात निश्चित भर पडत गेली; कारण पद्धत-





अनुक्रमणिका

शीरपणे तो नेमक्या विषारी गोळ्या चोरू लागला व त्या गरजवंतांना विकू लागला.

परंतु एके दिवशी त्याची ही चोरी पकडण्यात आली व मार्सेलवर सरळ खटला भरण्यात आला. त्याच्यात मानसिक वैगुण्य आहे असं खटल्यात निष्पन्न झाल्यामुळे त्याला वेडयांच्या इस्पितळात धाडण्यात आलं. सैन्यातून त्याला निवृत्त करून पेन्शन देण्यात आलं.

डोकं ठिकाण्यावर असल्यामुळे इस्पितळात त्याला फार दिवस रहावं लागलं नाही. पेन्शनाचे पैसे मिळत असल्यामुळे आपला वैद्यकीय अभ्यास पिटॉटने परत सुरू केला. युद्ध संपलं आणि तो डॉक्टर झाला. नंतर त्याने दवाखाना थाटला. धंद्याव्यतिरिक्त इतर क्षेत्रातहि तो लुडबुड करू लागला. तो नगरपिता झाला आणि पुढे महापौराची गादीही त्याने मिळवली.

ह्या सामाजिक कार्यामुळे व्हिलेनएव्हमध्ये त्याच्या ओळखी पाळखी वाढल्या व त्यामुळे त्याच्या धंद्याला चांगली बरकत येऊ लागली.

ह्या लोकप्रियतेच्या बुरख्याआड पिटॉटचे अनेक चाळे सुरू झाले. अगदी सुरुवातीला त्याची सुंदर मोलकरीण गरोदर राहली आणि एकाएकी रहस्यमयरित्या नाहीशी झाली! काही दिवसानंतरची हकीगत. त्याच्या पेशंटसमध्ये मॅडॅम डेवॉव्ह ही विधवा खूप श्रीमंत होती. एके दिवशी तिचा खून करण्यात आला व तिची सगळी संपत्ती लुटण्यात आली. संशयितांमध्ये डॉ. पिटॉटचं नांवही घेण्यात येऊ लागलं. पिटॉटवर संशय बाळगण्यात जो प्रमुख होता तो नेमका पिटॉटचा पेशंट होता. त्याला संधिवात होता. संधी साधून पिटॉटने त्याला संधिवातावर काही गोळ्या दिल्या. हे एक नवं औषध संधिवातावर आहे असं भासवून. आशेने त्या संशयित पेशंटने गोळ्या घेतल्या आणि काही तासातच तो मरण पावला! त्याचा 'पोस्ट–मॉर्टेम' करण्यात यावा अशी त्याच्या नातेवाईकांनी मागणी केली आणि आश्चर्य असं की, 'पोस्ट–मॉर्टेम'साठी पिटॉटचीच नेमणूक करण्यात आली. मृत्यु नैसर्गिकपणे घडला आहे, असं जाहीर करण्यात आलं.

१९२७ साली पिटॉटचे लग्न झाले आणि शेवटपर्यंत त्या दोघांनी संसार केला.

पण व्हिलेनएव्हमधील त्याचे सुखाचे दिवस आता भरत आले कारण दुकानादुकानातून घडलेल्या अनेक चोऱ्यांमध्ये ह्या लोकप्रिय डॉक्टराचा–जो महापौरही होता!–हात आहे हे उघडकीस आलं आणि त्याला पकडण्यात आलं.

पिटॉटला तीन महिन्यांची सजा फर्मावण्यात आली. शिक्षा भोगून आल्यावर व्हिलेनएव्हमधील लोकांच्या कृतघ्नपणावर पिटॉट चिडला व ते शहर सोडून तो पॅरीसला गेला. पॅरीसमधील त्याचं जीवन तीन-चार वर्षे सुरळीत चाललं. नंतर एका दुकानातून एक किंमती पुस्तक चोरताना त्याला पकडण्यात आलं. पिटॉटने सांगितलं–'पुस्तक चोरण्याचा आपला बिलकुल उद्देश नव्हता. परन्तु दुकानदार इतका कोत्या मनाचा निघाला की, त्याने पिटॉटवर ह्या जुजबी कारणासाठी खटला भरला. वैद्यकीय धंद्यातील प्रतिष्ठित लोकांच्या मदतीने पिटॉटने स्वतःची ह्या खटल्यातून सुटका करून घेतली; पण त्याच्यावर मानसिक उपचार करण्यात यावेत असं न्यायाधिशाने सुचविल्यामुळे त्याच्यावर पद्धतशीरपणे उपचार करण्यात येऊ लागले.

१९३९ साल उजाडलं आणि फ्रान्समध्ये युद्ध सुरू झालं; आणि पहिल्या महायुद्धातील कामगिरी (!) मुळे पेन्शन मिळालेल्या डॉ. पिटॉटने मोका साधून गोळ्या विकण्याचा आपला जुना धंदा सुरू केला.

त्याचा हा धंदाहि सुरळीत चालला नाही कारण १९४२ मध्ये पॅरीसच्या पोलिसांनी विषारी गोळ्या जवळ बाळगल्यामुळे एका तरुण मुलीस अटक केली. पोलिसांनी जाब विचारताच आपल्याला ह्या गोळ्या व्हॅन बेव्हर ह्या आपल्या प्रियकराने दिल्या असं तिने सांगितलं. व्हॅन बेव्हरला ताबडतोब अटक करण्यात आली. त्याने सरळ कबूल केलं **की** ह्या गोळ्या त्याला डॉ. पिटॉटने दिल्या. परंतु पिटॉट वस्ताद त्याने हे सरळ नाकबूल केलं. कोर्टाने व्हॅनला जामिनीवर सोडलं आणि हा तरुण माणूस इतका मूर्ख की, गांवभर सांगत सुटला–'आपण पिटॉटला मुद्देमालासह पकडून दाखवणार आहोत.'

आणि काही दिवसांनी अपेक्षेप्रमाणे व्हॅन बेव्हर एकाएकी नाहीसा झाला!

त्याच वर्षी डॉक्टरने आणखी एका मुलीवर ह्या गोळ्यांचा प्रयोग केला! भरमसाट किंमत आकारून डॉक्टर ह्या मुलीला तिच्या आवडत्या गुंगीच्या गोळ्या विकत असे. मुलीच्या आईला जेव्हा हे कळलं तेव्हा ती रागारागाने डॉक्टरकडे गेली व त्याला अद्वातद्वा बोलली. 'पोलिसच्या स्वाधीन करीन तुला' अशी वर धमकी दिली. परंतु पिटॉटला पोलिसच्या स्वाधीन करण्याऐवजी तिलाच पिटॉटने ईश्वराच्या स्वाधीन करून टाकले!

मागमूस न लागू देता एखाद्याला कायमचं नाहीसं करणं हे कृत्य पिटॉट सफाईने करीत असे. किंबहुना अशा कामात तो वाकबगार होता. गर्भपात करण्यात तो निष्णात होता. आणि त्यावेळी गर्भपतन करणे हा फ्रान्समध्ये गुन्हा समजला जात असे. त्याच्या एक-दोन पेशंटबद्दल त्याला नुसता चुगलीचा संशय आला त्याबरोबर ते पेशंट ह्या जगातून नाहीसे झाले!

जर्मनांनी फ्रान्स हस्तगत केला आणि डॉ. मार्सेल पिटॉटला सोन्याची खाण सापडली. शहरामध्ये ज्यू आणि कम्युनिस्ट लोकांची ही गर्दी झाली होती. त्यांची एकच धांवपळ उडाली होती. जो तो जर्मनांपासून आपला बचाव करू इच्छीत होता. कारण जर्मनांच्या हाती लागल्यावर मरण निश्चित आहे, हे भविष्य प्रत्येकजण ओळखून होता.

फ्रान्समधून बाहेर पळून जाण्यासाठी हे लोक वाटेल ते द्यायला तयार होते. जो तो कोणाला तरी गांठून त्याच्या मदतीने इंग्लंड–अमेरिकेकडे निघून जात होता–भरपूर पैसे मोजून मदत करणाऱ्यात डॉ. पिटॉटचं नांव प्रामुख्याने घेतलं जात होतं.










ह्या निधड्या छातीचा डॉक्टर पळून जाऊ इच्छिणाऱ्यांसाठी काहीही करतो म्हणे ! फक्त त्याची भेट आधी परवानगी घेऊन घेतली पाहिजे. आणि कटाक्षाने तो त्याच्या घरीच भेटतो.

पिटॉटने जेव्हा हे घर विकत घेतलं तेव्हा ते एक साधंसुधं घर होतं. पण काही महिन्यातच पिटॉटने त्या घरात नवल नगरी निर्माण केली !

ह्या घराचा जो हॉल होता त्याच्या सगळ्या खिडक्या त्याने प्रथम काढून टाकल्या, व फक्त एक लहानसा दरवाजा ठेवून त्या हॉलची त्याने कोठडी बनवून टाकली; तो दरवाजाही एका विशिष्ट पद्धतीचा करण्यात आला आणि त्याच्या वर कोपऱ्यात एक कांच बसविण्यात आली. आपण ह्या खोलीत कुत्री–मांजरी ह्यांच्यावर प्रयोग करणार आहोत. व प्रयोगाचे त्यांच्यावर कसे परिणाम होतात हे पाहण्यासाठी आपण ह्या कांचेचा उपयोग करणार आहोत असं तो ज्याला त्याला सांगत असे. ह्या खोलीचं दुसरं वैशिष्टय म्हणजे ती 'साऊंड प्रुफ' करण्यात आली होती.

हे सगळं व्यवस्थित झालं आणि पिटॉटची प्रवास कचेरी सुरू झाली.

हजारो लोकांना फ्रान्समधून बाहेर पडायचं होतं. बोटीमध्ये जागा मिळणं मुष्कील होतं. बोटी माणसांनी भरून जात होत्या. पण पिटॉटकडून तिकीट घेतल्यावर बोटीत निश्चित जागा मिळत असे असा लोकांचा समज झाला होता. फक्त तिकीट घेण्यासाठी त्याच्या घरी जायचं आणि एका तिकिटासाठी काही एक हजार फ्रँक्स पिटॉटला द्यायचे.

हे हजार फ्रँक्स भरणं ज्यांना परवडत होतं ते पिटॉटकडे यायचे आणि ते घरी परत न आल्यामुळे त्यांच्या मित्रांना व नातेवाईकांना वाटायचं ह्या परोपकारी डॉक्टराच्या मदतीने ते फ्रान्समधून निसटले ! मनातल्या मनात नातेवाईक डॉक्टरला धन्यवाद द्यायचे.

२० जून १९४४ रोजी ह्या घराशेजारी राहणाऱ्या एका शेजाऱ्याने अग्निशामक–दलाला फोन केला–"आमच्या शेजारच्या घरातील चिमणीतून खूप धूर येतोय. मला वाटतं बहुतेक आग लागली असावी. शेजारी घरात नसल्यामुळे घर बंद आहे तरी तुम्ही ताबडतोब या."

अग्निशामक–दलाचे सेवक ताबडतोब हजर झाले. घर कोणाचं आहे हे त्यांनी शोधून काढलं व ताबडतोब डॉ. पिटॉटला त्याच्या दुसऱ्या पत्त्यावर फोन केला. फोन पिटॉटच्या बायकोने घेतला. परिस्थिती ओळखून तिने नवऱ्याच्या हातात फोन दिला. न डगमगता पिटॉटने उत्तर दिले. "होय. ते घर माझंच आहे व माझा तेथे दवाखाना आहे. मी आलोच."

परंतु पिटॉटला यायला वेळ लागला म्हणून अग्निशामक-दलाच्या सेवकांनी घराचा दरवाजा फोडला; आणि त्यांना आश्चर्याचा धक्का बसला. काहीनी किंकाळ्या फोडल्या–खोलीत जिकडे तिकडे अस्ताव्यस्तपणे पडले होते मुडदेच मुडदे ! ! भानावर येऊन एक जण म्हणाला, "इथे आता आपलं काम नाही. पोलिसांचं आहे."

आणि ह्याच क्षणी डॉ. पिटॉट सायकलवरून येत होता. पोलिस आले. मुडदे पाहून सगळे घोटाळ्यात पडले होते. पिटॉटला घेऊन पोलिसांनी घर तपासलं. दुसऱ्या कुठल्याहि खोलीत मुडदे नव्हते. नंतर मुडदे मोजले. ते एकूण त्रेसष्ठ निघाले ! ! हा सगळा प्रकार होत असताना डॉक्टरने आपले डोके शांत ठेवले होते !

पोलिस अधिकाऱ्यांनी विचारले–"हे काय आहे ?"
पिटॉट म्हणाला, "मुडदे आहेत."
पोलिस अधिकाऱ्यांनी दरडावून विचारले, "कोणाचे ?"

पिटॉट शांतपणे म्हणाला,"दरडावता कशाला ? हे जर्मनांचे मुडदे आहेत. शत्रुचा निःपात केलाय मी. केवढं मोठं देशकार्य केलंय पहा."

मुडदे इतके छिन्नविछिन्न झाले होते की, ते फ्रेंचांचे आहेत. कीं, जर्मनांचे आहेत हे कोणीच सांगू शकलं नसतं. पिटॉटचा कार्यभाग झाला. पोलिस अधिकाऱ्यांनी त्याला सोडून दिलं. सायकलवर टांग मारून तो हंसत हंसत निघून गेला !

परंतु हे प्रकरण चिघळत गेले. पिटॉटला कोर्टात उभं करण्यात आलं. ते मुडदे जर्मनांचे व फ्रेंचांच्या इतर शत्रूंचे आहेत हेच त्याने कोर्टात सांगितलं. आपण फ्रान्समधील एका क्रांतिकारी संस्थेचे सदस्य म्हणून काम करतो असंहि त्याने सांगितलं आणि इथेच त्याने चूक केली.

कोर्टाने लगेच विचारलं–'कुठली क्रांतिकारी संस्था ? नांव सांग.'
पिटॉट नांव सांगू शकला नाही !
"पुरावा म्हणून तूं काही उपलब्ध करू शकतोस ?"
पिटॉट कुठलाच पुरावा उपलब्ध करू शकला नाही !

पिटॉटच्या मदतीने फ्रान्स सोडून गेलेल्या आपल्या मित्रांचं अजून एकही पत्र नाही की, काही खबरही नाही म्हणून अनेक लोक कोर्टात येऊन साक्षी देऊन गेले. पिटॉटने नक्कीच त्यांचं काही तरी बरंवाईट केलं असावं असा संशयही त्यांनी व्यक्त केला.

ह्या संतापलेल्या लोकांनी पिटॉटला जास्तीत जास्त शिक्षा करावी म्हणून कोर्टाला विनंती केली. पिटॉटने ह्यापूर्वी केलेले गुन्हे लक्षात घेऊन व त्याच्या ह्या अजब खाटिकखान्याची भीषणता ओळखून कोर्टाने त्याला शिक्षा फर्मावली–शिरच्छेद !

२६ मे १९४६ च्या पहाटे बायकोने आदल्या रात्री आणून दिलेला लिननचा स्वच्छ पोषाख घालून डॉ. मार्सेल पिटॉट वधस्तंभाकडे निघाला. त्याच्या गतीत उतावीळपणा नव्हता. चेहऱ्यावर समाधान विलसत होते. वधस्तंभाजवळ असलेल्या यज्ञवेदीजवळ तो गेला. "माझा असल्या फालतू गोष्टीवर विश्वास नाही परंतु माझ्या बायकोच्या समाधानासाठी मी प्रार्थना करतो." असं म्हणून त्याने ईश्वराची प्रार्थना केली.

नंतर धीरगंभीर पावलांनी तो वधस्तंभाजवळ गेला. शांतपणे त्याने वधस्तंभाकडे पाहयलं. हा शेवटच्या क्षणी तरी मुडद्यांचं रहस्य सांगेल म्हणून आशेने जमलेल्या लोकांना त्याने निराश केले. वर जेलरला सांगितले, "ह्या सगळ्यांना बाहेर घालवा. मला लघुशंका करायची आहे." जेलरने त्याची ही खोडसाळ विनंती मान्य केली नाही, उलट मिस्किलपणे त्याला सांगितलं ही लघुशंका दुसऱ्या जगात जाशील तेव्हा तेथे कर. पिटॉटला यंत्राला असलेल्या चकचकत्या सुऱ्याखाली उभं करण्यात आलं.

त्याच्या विरुद्ध साक्ष देणाऱ्या आसामीने त्याला पुन्हा खडसून विचारले–'आता तरी सांग खरं.' मान उडवीत डॉक्टर म्हणाला, "माझ्या बरोबर चला. त्या दुसऱ्या जगात सांगतो."

आणि एका हिसक्यासरशी तो सुरा खाली आला.

• • •









**ज्वाला आणि फुले ● वेगळी ● एका पथिकाची जीवनयात्रा**

## संवेदनाक्षम मनाचे व शोधक बुद्धीचे आविष्करण

प्रचंड, भव्य, महान्, दिव्य इ. इ. शब्द 'ज्वाला आणि फुले' ही कृति परिशिलीत असताना मनात येत राहतात एकटेपणाने हे शब्द रोख धरतात. तसेच यांच्या शक्य तेवढया जोडया बनून वेध घेतात. असे असूनहि प्रत्यक्ष समीक्षण टंकित करताना हे शब्द वापरण्याचा मोह कटाक्षाने टाळावा असे तीव्रतेने जाणवते. कारण प्रत्यक्ष व्यवहारात आणि वापरात हे शब्द कोणताहि स्थूल अनुभव आणि उलथापालथीची साधी घटना व्यक्त करण्याकरता मोडीस घातल्याने गुळगुळीत झाले आहेत. 'ज्वाला आणि फुले' यातील आविष्करण हे उर्ध्वगामी जीवनाने कंपित, स्पंदित आणि चकित झालेल्या संवेदनक्षम मनाचे जसे आहे तसेच जगातील पडझड आणि जडण-घडण याने अंकुषित, जागृत आणि उर्जित बनलेल्या शोधक बुद्धीचे आहे.

'पंखांना क्षितिज नसते त्याना फक्त झेपेच्या कवेत मावणारे आकाश असते. मातीची ओढ भेदीत उठतात पंख' या किंवा

'मात्र दक्षिण समुद्राच्या मिठीत शिरणाऱ्या गंगेचे किनारे अजून जागे व्हायचे आहेत. दारिद्र्य आणि दैन्याचे दुष्टचक्र अजून येथे गरगरतेच आहे. उद्याच्या भोगासाठी आजच्या त्यागाची न संपणारी मतलबी आव्हाने अजून सुरूच आहेत.'

ह्या ओळी हे मनावर यथार्थतेने बिंबवतात. म्हणूनच 'ज्वाला आणि फुले' यातील आशय आणि अर्थघनता ही साहित्याची किंवा शब्दांच्या रुढ संकेताच्या आधारे पूर्णपणे आकलणे कठिण आहे. आपण ज्या युगातून चाललो (चलित न बनताहि) आहो त्या युगात मानवाची स्वयंपूर्णता आणि पराधीनता दोन्हीही शिगेला पोहोचल्याचे विचित्र दृश्य दिसते. समर्थता आणि विकलांगता यांचे सहजीवन आयुष्य कंठण्यात गति आणि परागति यांचा गोंधळ करत असल्याचा भास होतो. परन्तु या सर्वांच्या भीतरी जीवन प्रवाहाची धारणा भग्न ओढ उद्घोषित जी करतात ती अशी:

'येथे नांदतात श्रमर्षी, या भूमीला क्षरण नाही

येथे ज्ञान गाळते घाम, विज्ञान दानव-शरण नाही.

येथे कला जीवनमय, अर्थाला अपहरण नाही.

येथे भविष्य जन्मत आहे, या सीमांना मरण नाही.

...या. ..सीमांना...मरण नाही ...!'

'ज्वाला आणि फुले'त अंकित अनुभूति ही समरसून जीवनात बुडाली. त्यातून बाहेर आली, तिने ओलेपणाचे ओझे जावे म्हणून अंग झटकले आणि ती तटस्थ बनली पण तिने वेदना गमावली नाही. येथे व 'ज्वाला आणि फुले'तील शब्दन् शब्द व्यथित, अस्वस्थ आणि उत्तेजित जे करतो त्याचे रहस्य दडलेले आहे. यामुळेच शब्दांना नवी क्षितिजे आली आहेत. Semen of generations चे 'शतकांचे शुक्र' असा मराठी पहेराव केवळ भाषांतर वाटत नाही. तो अर्थाचा आणि आविष्काराचा नवा अवतार ठरतो.

जीवनाकडे सर्वच पाहतात आणि त्यावर बोलतात. प्रत्येकजण आपण स्वत: गोळा केलेले ज्ञान, कबूल केलेले (किंवा क्वचित स्वीकारलेले) परिस्थितीचे आव्हान, स्पर्श करून गेलेले वातावरणातील (मनुष्य आणि वस्तु यांचे) आवाहन, दिपवून टाकणारे चैतन्य आणि विश्वाचे अनाकलनीय वाटणारे घनत्व याच्याशी कमी अधिक कसरत करून आयुष्याचे कर्म आणि मर्म साधत असतो. यातच अहंकार आणि पुरुषार्थ यांचा खेळ सुरू होऊन अहंकारा पुरुषार्थाला ग्रासतो. जग आणि विश्व यांचे संकलित आणि सम्यक् चित्र अनेक योजने दूर जाते. पण आपण म्हणतो तेच साक्षेपी सत्य असा वरवर वाटणारा आत्मविश्वास ठसकू लागतो. स्वत:ला आणि इतरांनाहि 'दर्शन' घडवल्याचे वृथा समाधान तेवढेच वांझपणे राहतो. वास्तविक जीवनदर्शनाची प्रक्रिया ही जशी स्थित नाही तद्वत शब्दाच्या आणि कल्पनेच्या चिमटीत पकडून ठेवण्यासारखी अनुभूति नाही. ती प्रत्यय घेण्याची अवस्था आहे. असा प्रत्यय घेतल्याचे पडसाद 'ज्वाला आणि फुले'मध्ये शब्दाशब्दातून जाणवतात.

(१) 'असे काही क्षण उजाडतात की, प्रज्ञेचे स्वप्नात मेघ अनोळखी दिशांनी दाटून येतात.'

(२) 'वैफल्य फक्त वणवण् शकते, वाट शोधू शकत नाही.'

(३) 'देहामधल्या अन् बाहेरच्या दुष्मनाशी घेतो टक्कर<br>फुटते माथे, येते चक्कर<br>दिवस रात्र हा अखंड संगर<br>पुन्हा पुन्हा धडपडतो, पडतो<br>घाटावरल्या चढणी चढतो<br>पडतो तेव्हा रडतो थोडे.'

(४) "शोषणाने जो समृद्ध होतो तो समाजाला शाश्वत अंधार देतो !<br>तुम्ही तेथे श्रमाने समृद्ध व्हाल<br>त्यामुळे तुम्ही जाणाल की, जीवनाचे नाते हे फुलांचे व मधमाशांचे नाते आहे.<br>ते रक्ताचे व जळवांचे नाते नाही.<br>फुलांना देण्यात आनंद आहे

मधमाशांना ते दिलेले घेण्यात आनंद आहे.

त्यात मधमाशीचा विलास आहे, आणि फुलांचा विकास आहे.









अनुक्रमणिका

श्रमाच्या संपन्नतेने तुडुंब होऊन
जेव्हा तेथून तुम्ही निघाल.
तेव्हा तुमच्या मस्तकांचे, हृदयांचे
व हातांचे चुंबन घेत
दीक्षेचा हा मंत्र मी तुम्हाला देईन
'झुंझत रहा ! ढासळू नका !'
कारण तुम्ही तुमच्यावरोबर आपले
पूर्णत्व नेत आहात !"

—वानगी दाखल उद्‌धृत केलेल्या वरील ओळीवरून याचा काहीसा बोध व्हावयास हरकत नाही. पण या बोधाचे स्वरूप कळावयास जीवनाचा शोध घेण्याचा सोस जो आमटयाना आहे त्याचा तलास घेतला पाहिजे. बाबा आमटयांचे शब्दाकरता जीवन 'ओळंगले' नाही. सर्व प्रथा आणि संकेत झुगारून मानवपूत कार्यात गढले असताना त्यांची जाग आणि अवधान हरपले नाही. 'आहे'पणाने कर्मात काही बाजूला सारले. जेवताना मुले 'हातचा' राखतात तसे आणि त्याची झाली 'ज्वाला आणि फुले'. चरित्रातला पुरुषार्थ जागा होतो आणि अहंकाराशी संवाद साधून जेव्हा आगेकूच करतो तेव्हा चारित्र्याचे बऱ्याच वेळा जे अनेक अंगाने सृजन चालू होते त्याचा परिपाक म्हणजे हे पुस्तक होय. त्याचे गद्य-पद्य असे वर्णन अपुरेच ठरणार आहे. कारण हे मौलिक साहित्य आहे. अशा साहित्य-वरून साहित्याचे प्रकार ठरतात. साहित्या-तील रूढ प्रकाराने असे साहित्य जोखले जाऊ शकत नाही. प्रत्येकाने हे वाचून धुंदी ओसरली तर याचा पडताळा घ्यावा.

—दा. गो. देशपांडे

[ ज्वाला आणि फुले —लेखक—बाबा आमटे. साधना प्रकाशन—शनवार पेठ, पुणे २. मूल्य ४ रु. ]

## माणसांची विविध रुपे दाखविणारी 'वेगळी'

**श्री**. अरविंद गोखले ह्यांचा हा एक नवा कथासंग्रह. ह्या संग्रहास 'वेगळी' हे नांव एका विशिष्ट हेतूने दिले असावे असे वाटते. गोखल्यांचा 'स्त्री' विषयक एक विशिष्ट दृष्टिकोन आहे. त्यांच्या कथेतील नायिका या बहुधा त्यागी, भव्य, उदात्त हेतूने प्रेरित अशा असतात. ह्या भूमिकेतून विचार करता' 'वेगळी'मध्ये एका वेगळ्या स्वरूपाची 'स्त्री' गोख-ल्यांनी साकार केली आहे. त्या दृष्टीने ह्या पुस्तकाचे वेगळेपण उठून दिसते.

असे असले तरी सदर संग्रहातील १५० पृष्ठांच्या २६ कथांतून गोखल्यांच्या कथेची सर्व वैशिष्टे ठळकपणे जाणवतात. घटनांपेक्षा, पात्रांपेक्षा एकाद्या लहानशा क्षणाला, भावनेला, मनोव्यथेला महत्त्व देण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा, जीवनांतील विलक्षण बारकावा हेरण्याची त्यांची प्रवृत्ति, व्यक्तीला केंद्रित करून सुद्धा जीवनाचे सखोल दर्शन घडविण्याची यांची जिद्द, कल्पकता आणि चमत्कृति यांचे मनोहर मिश्रण करण्याची त्यांची हातोटी ही सर्व वैशिष्टयें ह्या संग्रहातील कथातूनही प्रकट झाली आहेत.

'पाळणा,' 'सूर्यास्त,' 'खेळ' ह्या कथा-तून लहान मुलांच्या मानसशास्त्रीय भूमिकेतून जीवनाचे एक कटु पण सत्य दर्शन आले आहे. मोठ्यांना अंतर्मुख करावयास भाग पाडतील अशा ह्या कथा आहेत. 'सूर्यास्त' ह्या कथेत समाजातील उच्च सुखवस्तु कुटुंबातील लहान मुलांच्या मानसिक व्यथेची समस्या उत्तम तऱ्हेने हाताळली आहे. ह्या उलट 'खेळ' ह्या कथेत खालच्या वर्गातील कुटुंबातील मुलांच्या सुप्त जिज्ञासेचे मर्मग्राही पण वास्तव दर्शन आहे. आपलं स्वातंत्र्य, तारुण्य, प्रणयी जीवन कायम रहावं म्हणून घर-कामास मुलगी मिळाल्याने सुखावलेल्या पुष्पाताई, आपल्या मुलीचं कल्याण होणार, ठिगळाच्या संसाराला महिन्याच्या दहा रुपयांची भर पडणार म्हणून आनंदून जाणारी सोनुबाई व आपले स्वातंत्र्य नष्ट होणार म्हणून नाराज होणारी सई ह्यांच्या भावनांचा सुंदर त्रिकोण 'पाठ-वणी' ह्या कथेत निर्माण झाला आहे. 'आनाघ्राता' ही कथा विशेष उल्लेखनीय आहे. आपल्या मना-विरुद्ध 'चुंबन' घेतलेल्या पुरुषाला, जणू आपले सर्व शरीर भ्रष्ट झाले आहे ह्या समजुतीने आपले सर्वस्व त्याला स्वतःहून अर्पण करण्यास निघालेली काव्यकच्ची अर्धस्वप्नील मधुराणी महाजन 'आना-घ्राता' मध्ये वाचकांच्या हृदयाचा ठाव घेते.

'वेगळी'मध्ये एका निराळया 'स्त्री'चेहि दर्शन घडते. थोडयाश्या झुकत्या मापाने कुरुप मुलींचीही लग्न होऊ शक-तात असा आशावाद बाळगणारी 'झुकतं माप' मधील रेवती; वयाची ३५ वर्षे उलटून गेल्यानंतर बुद्धीची जोड, मनाची क्रीडा ह्या साठी विवाहित पुरुषा-बरोबर लग्न करण्याची इच्छा बाळग-णारी 'शोकांतिके'ची नायिका; आपल्या रसरशीत तारुण्याचा अव्हेर करून दुलारी-सारख्या सामान्य स्त्रीसाठी जीव टाक-णाऱ्या आपल्या प्रियकराचा द्वेष करणारी 'जरतारणी'; नेहमी लोंबकळत चुंबन घेण्याच्या विशिष्ट पद्धतीने कोडयांत पाडणारी 'पावणेसात फूट उंच' मधील विक्षिप्त शीला आरोरा; आपल्या दिवंगत अर्भकाचे दर्शन न झाल्याने खंत बाळगणारी 'चुटपुट' ची नायिका; आधी सासू आणि नंतर सून यामुळे स्वतःच्या संसारात सत्ता गाजविण्याची इच्छा अपुरी राहणार म्हणून निराश झालेल्या 'अतृप्ता' मधील बाई. "एक पत्र"मधील सासऱ्याला शेव-टच्या काळांत स्त्री मनाचा आधार द्यावा अशी इच्छा प्रकट करणारी सुहासिनी अशा विविध प्रकृतीच्या 'स्त्री' चे चित्रण करण्यात गोखले कमालीचे यशस्वी झाले आहेत. ह्या कथांत स्त्री—पुरुषांच्या प्रेमाची व्यथा नसली तरी इतर अनेक व्यथांतून ह्या कथा निर्माण झाल्या आहेत.

'राणीपान,' 'जीवनरस,' 'उतरंड,' 'गुपित,' 'सावली' आणि 'उतार' ह्या कथा वेगळ्या स्वरूपाच्या आहेत. जीवन विषयक तत्त्वज्ञान, विधिलिखित, उदासी-नता, तारुण्यातील हुरहुर इत्यादि प्रका-रच्या भावना ह्या कथात जाणवतात, व

त्या वाचकांना अधिक विचारशील बनवितात. मरणोत्तर प्रसिद्धीस आलेल्या साहित्यिकाच्या जीवनाची शोककथा 'जीवनरस' कथेत परिणामकारकतेने चित्रित केली आहे. त्याच प्रमाणे 'शोक' ही कथाही हृदयस्पर्शी आहे. 'कांगावा'-मधील कांगावखोर प्रा. चंद्रशेखर, स्वतःचा रंग काळा असला तरी गोऱ्या सुनांच्या सहाय्याने भावी संतती गोरी करण्याचा हव्यास बाळगणारे 'रंग' मधील विक्षिप्त दाजीसाहेब वाचकांच्या मनात घर करून बसतात.

'वेगळी' मधील कथांचे स्वरूप हे असे आहे. त्यात गोखल्यांच्या कथेची सर्व वैशिष्टे तर आहेतच पण शिवाय त्यांचा एक खास असा वेगळेपणाहि आहे. दीर्घकालीन लेखनानंतर सुद्धा स्वतःचा असा दृष्टिकोन गोखल्यांना अद्याप प्राप्त झालेला नाही (जो गाडगीळ–भावे ह्यांच्यात आहे) अशी टीका करणारांना ह्या संग्रहात काही उत्तर मिळू शकेल अशी आशा बाळगण्यास हरकत नाही. 'शैली' चा निरर्थक हव्यास, बडेजाव गोखल्यांजवळ नाही. त्यामुळे त्याचा विशेष उल्लेख करण्याची आवश्यकता नाही. एकंदरीत गोखल्यांच्या किर्तीला साजेसा असाच हा संग्रह आहे.

**–नीळकंठ देशपांडे**

[**वेगळी** (कथासंग्रह) **अरविंद गोखले**, मनोरंजन प्रकाशन मुंबई ४. मूल्य ४ रु. ]

## कुठेंही उत्कट न झालेलें आत्मचरित्र !

**"आत्मचरित्र"** हा मोठा आव्हान देणारा वाङ्मय प्रकार आहे. ती एक तारेवरची कसरत आहे. खरें, खोटें, दांभिकतेनें लपवलेलें वा एखादी 'पोझ' घेऊन सांगितलेलें असे विविध प्रकार आत्मचरित्रांत सांपडतात. आपल्याकडे तर 'आत्मचरित्र' हा प्रकारच मोठ्या फसव्या पद्धतीनें हाताळला जात आहे. (चरित्रांतही हा भाग येतोच. तिथेंही चरित्र नायक हा महापुरुष, सद्गुणांचा पुतळा, कधींही न चुकणारा, अस्खलनशील असाच गृहित धरण्याची पद्धत आहे) तशीच आत्मचरित्राचा नायक आपले जय रंगवून मांडतो. पराभव मात्र मोकळेपणानें मान्य करीत नाहीं. कदाचित मान सांगावा जनांत अपमान सांगावा मनांत हेंही कारण असावें. त्यामुळें आत्मचरित्राच्या वाचनानें समाधान तुलनात्मक दृष्ट्या कमी लाभते. असल्या आत्मचरित्रांच्या मागची कारणमीमांसा हा एक स्वतंत्र चर्चेचा विषय आहे. म्हणून तो येथेंच सोडून मी माझ्या हातीं असलेल्या '**एका पथिकाची जीवनयात्रा**' ह्या मोरेश्वर वासुदेव जोशी लिखित आत्मचरित्राकडे वळतो. प्रस्तुत पुस्तकाला यंदाचें आत्मचरित्रविषयक पारितोषिक (राज्य सरकारचें) मिळालेले असल्यानें ह्या पुस्तकाबद्दल रसिक वाचकांचे मनांत उत्सुकता असण्याची शक्यता मी गृहित धरली आहे.

मो. वा. जोशी हे मागच्या पिढींतील एक विनोदी लेखक व कादंबरीकार म्हणून प्रसिद्ध होते. आजच्या पिढीला ते फारसे परिचित नाहींत कारण त्यांनी लेखन स्थगित केल्याला दोन तपांहून अधिक काळ लोटला आहे. त्यांच्या कादंबऱ्याहि संख्येनें फार नसल्याने त्यांच्या वाङ्मयीन गुणावगुणांची चर्चाही आजच्या पिढीसमोर नाहीं. त्यामुळें ह्या आत्मचरित्रानें त्यांचा परिचय मराठी वाचकांना करून देण्याचे कार्य '**पॉप्युलर प्रकाशनाचे** श्री. भटकळशेठ यांनीं साधलें आहे. एका अपरिचिताचे हें आत्मचरित्र मराठी वाचकांना त्या दृष्टीनें स्वागतार्ह व टेल.

ह्या आत्मचरित्रांत प्रारंभी प्रकरणशः लेखकानें आपलें बालपण त्यांतल्या सर्व कटुतेसह सांगितलें आहे. दारिद्र्यानें शिक्षणदृष्टया व सामाजिकदृष्टयाही माणसाला कशा संघर्षांतून जावें लागतें याचें चित्रण तेथें सांपडतें. त्या काळांतली मानसिक कुचंबणा व त्यांतून होणारी जडणघडण, त्रिस्थळी यात्रा यांचा आलेख वाचून मन सुन्न होते. त्यानंतरच्या काळांत लेखकाचें सांसारिक जीवन, वाङ्मयीन जीवन व प्रथम पत्नीचा मृत्यु, द्वितीय पत्नीचा लाभ, मुलींचा जन्म व विकास, व सुस्थिर, शांत जीवनाचा लाभ एवढा जीवनाच्या दृष्टीनें महत्त्वाचा भाग येतो. हा सारा भाग वाचतांना मात्र माझें समाधान झालें नाहीं. लेखकाचें आत्मचरित्र म्हटल्यानंतर कांहीं एक वेगळी अपेक्षा असते. लेखनामागच्या प्रेरणांचा शोध तिथें लागावा; कथा, कथानकें, कुठून कशी मिळालीत, कशी मिळतात, याची कांहीं कल्पना त्यांत यावी अशी अपेक्षा असते. कादंबऱ्या लिहितांनाची भावस्थिति, येणारीं संकटें, त्यांतून टक्कर देऊन उभें राहणारें वाङ्मयीन व्यक्तित्त्व वगैरे गोष्टींचा शोध हवा असतो. पण ह्या चरित्रांत त्याबाबत केवळ जंत्री मिळते. लेखकानें शिक्षक म्हणून तीस-बत्तीस वर्षें नोकरी केली एवढेंच स्थूल रुपानें कळतें. पण शिक्षकाच्या भावजीवनाचे, बऱ्या वाईट अनुभवांचे, यशस्वी विद्यार्थ्यांचे, त्यांनीं व्यक्तविलेल्या कृतज्ञतेचे (वा कृतघ्नतेचेही) आलेख यांत नाहींत. गेल्या पिढीतील एक कवि ह. स. गोखले ह्यांची पानापानांतून साक्ष काढली असली तरी गोखल्यांची व्यक्तिरेखा कुठेंही साकारत नाहीं. वस्तुतः अवघ्या जीवनांत सांवलीसारखी साथ करणाऱ्या ह्या मित्राची व्यक्तिरेखा जोशांनीं द्यायला हरकत नव्हती. आपल्या पहिल्या पत्नीच्या निधनानंतर लेखकानें स्वाभाविकपणेंच कांहीं विलाप केला आहे. परंतु त्या स्त्रीच्या आणि लेखकाच्या सांसारिक जीवनांतील उत्कटतापूर्ण प्रसंग मात्र त्यांत अपवादरुपानें आले आहेत. नंतरच्या पत्नीचा, तीन मुलींच्या वरोवरच्या सांसारिक जीवनाचा आलेखही धांवता व जंत्रीवजा आला आहे हें जाणवतें. प्रत्येक व्यक्तीही कांहीं प्रमाणांत तरी त्या त्या काळाची 'प्रॉडक्ट' असते. पार्ले, डोंबिवलीसारख्या सामाजिक–साहित्यिक क्षेत्रांत अग्रभागी राहणाऱ्या गांवातल्या तद्विषयक चळवळींशीं लेखकाचा थोडाफार तरी संबंध आला असण्याची शक्यता आहे. पण ह्या पुस्तकांत संबंधित कार्यांचा वा व्यक्तींचा साधा नामोल्लेखही नाहीं ही गोष्ट कांहींशी खटकते. ह्या पुस्तकांत लेखक कुठेंही उत्कट झाल्याचें जाणवत नाहीं. त्यामुळें त्याला कलात्मक घाटही आला नाहीं. आणि साहित्य, शिक्षणासंबंधींचा कांहींही आलेख मिळत नसल्यानें अपरिहार्यपणें येणाऱ्या सामाजिक चित्रणालाही ते पारखे झाले आहे. एका पथिकाच्या जीवनाची जंत्री एवढेंच स्वरूप ह्या पुस्तकाचे उरते.

**–प्रभाकर अत्रे**

[**एका पथिकाची जीवनयात्रा**–मोरेश्वर वासुदेव जोशी. पॉप्युलर प्रकाशन. मुंबई ३४. मूल्य पांच रुपये]






# असे पाहिले असे ऐकले

"**कान** असून ऐकायचं नाहीं. डोळे असून पहायचं नाही. तोंड असून बोलायचं नाहीं." ही गीता कारकुनी जगात (कदाचित) उपयुक्त ठरत असली, तरी कलेच्या क्षेत्रांत, साहित्याच्या क्षेत्रांत रसिकतेने जीवनानंद उपभोगण्याचे दृष्टीने फारशी उपयोगी ठरत नाहीं. त्यामुळे डोळे उघडे ठेवून मी हिंडतो. कानांत बोळे घालणे मी भूषणास्पद मानीत नाही. (त्यामुळे कधी कधी नको ते व नको तितकेही ऐकावे लागते म्हणा) पण जगात असे नेहमीच होते नाहीं कां ? गुलाबासाठी काटे स्वीकारायची तयारी लागतेच ! तेव्हां सांगायचं काय की मी डोळे उघडे ठेवून भटकलो. कलेच्या वासावर भटकलो आणि नकळत माझी पावले जहांगीर आर्ट गॅलरीकडे वळली. तिथे तीन चार चित्रकारांची चित्रप्रदर्शने चालू होती. चित्रप्रदर्शनांत आपल्याला केवळ तो चित्रकारच भेटत नाही तर त्या चित्रांच्या चौकटीतून रंगांच्या झिरझिरीत पडद्याआडचे आपले 'जीवन'च जणुं भेटत असते असे मला नेहमीच वाटत आले आहे. ते जीवन कधी नव्या नव्या प्रतिमांच्या रूपानें भेटते तर कधी नुसते रंगाचे पट्टे-उभे-आडवे कांहींतरी सुचवून जातात. त्या रेषांतून व्यक्त होणारा आशय, रंगात दडलेले जीवन चित्रण शोधून घेण्यासाठी डोळे उघडे ठेवावे लागतात. त्यादिवशीं मी शिरलो आणि प्रथम **मनोहर मकवाना** ह्या तरुण चित्रकाराच्या चित्रदर्शनाकडे वळलो. मकवाना हे आजचे एक 'प्रॉमिसिंग' असे चित्रकार मानले जातात. जे. जे स्कूल ऑफ आर्टस्‌चे ते विद्यार्थी ! ड्रॉइंग ॲण्ड पेंटिंगचे विद्यार्थी ! सर्व सामान्यपणे सर्व महत्वाच्या प्रदर्शनांत ते भाग घेत असल्याने साऱ्यांना परिचित ! मुंबई राज्य प्रदर्शनांत उत्तम कलाकृति सादर करण्याबद्दल त्यांना पारितोषिक मिळाले होते. तसेच त्यांना चवथ्या गुजराथ राज्य प्रदर्शनांत स्वरूपदर्शनपर (Graphic) चित्राबद्दल पारितोषिक मिळाले. १९६४ मध्ये त्याच विषयावरील चित्रणाबद्दल त्यांना ललित कला अकादमीचेही पारितोषिक मिळाले. १९६५ मध्ये त्याच विषयाबद्दल कलकत्त्याच्या अकादमी ऑफ फाइन आर्टस्‌चेही बक्षीस मिळाले. यथातथ्यचित्रण ही मकवानांची स्पेशॅलिटी आहे. परवांच्या प्रदर्शनांत त्यांनीं कांही ग्राफिक्स व पेंटिंग्ज सादर केली होती. त्यांच्या कांहीं विषयांत मला तोच तो पणा (विषयांबाबतचा व चित्रणाबाबतचाही) जाणवला. उदाहरणार्थ 'पक्षी विक्ये' वोटी ! त्यांच्या Still Life स्थिर चित्रणांतही कांहींसा तोच तो पणा जाणवला. पण ए मेडन, शेपर्ड, सूर्यफुले, जोडपे ह्या 'ग्राफिक्स'-मध्ये आकर्षकता खूप होती. विशेषतः मेडन, शेपर्ड ही चित्रे पहात असतांना आपण आर्ट गॅलरीत नसून त्या परिसरांत वावरतो आहोत असें जाणवले. पेंटिंग्जमध्ये दूधवाली, वोटी, पक्षी-विक्ये, बाजार, तिची जोडीदारीण वगैरे चित्रे लक्ष वेधून घेत होती. रंगातून भाव स्फुरणे ही किमया मकवाना करून जातात. हा तरुण कलाकार आपल्या कलाकृतीत जर अधिक विविधता आणूं शकला तर ते कलेच्या दृष्टीनें आवश्यक आहे.

## "डीझी"

'डिझी' हे नांव मी व्यंगचित्रांखालीं वारंवार वाचले असल्याने व त्यांच्या व्यंगचित्रांचेच असे खास वेगळे प्रदर्शन असल्याने नकळतच अंजनी देसाईची चित्रे बोलावीत असतांनाही मी 'डिझी' च्या चेंबरकडे वळलो. डिझी हे प्रामुख्याने वृत्तपत्रीय (व मुख्यतः राजकीय) व्यंगचित्रे काढीत असल्याने साहजिकच राजकीय वा चालू विषयांवरील चित्रे पहायला मिळतील अशी अपेक्षा होती. परंतु त्या चेंबरमधील चित्रें पाहिल्यावर अराजकीय विषयावरही त्यांनी किती विविधतापूर्ण व्यंगचित्रण केले याची कल्पना आली. डी झी यांच्या केवळ व्यंगचित्रांचे असे हे पहिलेच प्रदर्शन. त्यापूर्वी त्यांनी मुंबई व दिल्ली येथे मिळून सातआठ 'एकपात्री' प्रदर्शने सादर केली. त्यांत कांहीं कार्टून्सही होती. ह्यावेळी पेंटिंग्ज् न ठेवतां केवळ व्यंगचित्रे होती ! डिझी हे 'पॉकेट कार्टून्स' चे जनक म्हणून भारतीय पत्रसृष्टीत मानले जातात. श्रीयुत (फ्रिप्रेस) व श्रीमति (नवशक्ति) ही नांवे सुपरिचित ! निव्वळ गृह शोभा (House Decoration) वा मनोविनोदन करणारी अशी ही व्यंगचित्रे आहेत. हलका फुलका विनोद (लाइट ह्यूमर) देणे येवढीच त्यांची भूमिका आहे. 'संदेश' वा 'सूचना' देणें त्यांत नाहीं !! ह्या प्रदर्शनांत कांहीं 'विषय' असल्याचे जाणवले. उदाहरणार्थ, विविध प्रकारचें नाके धारण केलेले चेहरे त्यांनी कार्टून पद्धतीने रंगविले आहेत. मानवी देहाचे










वेगवेगळे कोन नाकाच्या जागी वसविल्यामुळें मूळ पुरुषांचे चेहरे किती वेगवेगळे आकार धारण करतात ते 'पाहणे' गंमतीदार वाटले. 'केश प्रसाधन' हा खरं म्हणजे सौंदर्य वाढीचा विषय ! परंतु पुष्कळदां न पेलणाऱ्या गोळ्या घेण्याची माणसाला (त्यांत स्त्रिया आल्याच) संवय असते. त्यांतून निर्माण होणारा विनोद नाटकाचा (तुझे आहे तुजपाशी) व व्यंगचित्रांचा यशस्वी विषय होतो. केश-प्रसाधनाने (न पेलत्या) होणारा विनोद मार्मिक, मिश्किल व बोचरा वाटला. गवई–वस्तादांचा संगीताचा ताफा रंगविणारे चित्रही मार्मिक वाटले. 'बळी'चे तत्व सांगणारी कांहीं व्यंगचित्रे (कुत्र्याच्या पोटांत मोठा मासा-त्याच्या पोटांत छोटा मासा) सूचक व बोलकी वाटली. 'डिझी'च्या चित्रणात विविधता–विषय व शैलीचीही जाणवते. मला मात्र त्यांची गाजलेली राजकीय व्यंगचित्रें त्यांत असायला हवी होती असे वाटतें. पेण्टिंग आणि व्यंगचित्रण ह्या विषयात वेगळेपण कायम रहावे म्हणून कांही काळ ह्या कलावंताने नौकरी सोडून केवळ पेण्टिंग्जवर लक्ष केंद्रित केले. आज ह्या दोन्ही गोष्टींवर त्यांनी प्रभुत्व मिळविले आहे. त्यांची कांहीं व्यंगचित्रे न्यूयॉर्क टाइम्स, हेराल्ड, ट्रिब्यून वगैरेत पुनर्मुद्रित झाली व कांहींना तर अमेरिकेंत शालेय-विद्यालयीन टेक्स्टबुकांतही समाविष्ट झाली आहेत. युनोपासून तर विविध म्युझियम्समधून 'डीझी' हे नांव मिरवतांना दिसते. नवकलेचे ते एक व्यासंगी पुरस्कर्ते असून यथातथ्य चित्रण, आविष्कारप्रधान शैली (Expressionist) चे ते एक प्रतिनिधी मानले जातात. भारतीय शिल्पांचा त्यांनी चांगला अभ्यास केला आहे. कार्टून्स बाबत बोलतांना त्यांनीं स्वतंत्रपणे ती शैली निर्माण केल्याचे सांगितले. राजकीय अभ्यास, वाचन, मननांतून विषय सुचत जातात. राज्य शास्त्राचा व राजकारणाचा मूलगामी व अद्यावत अभ्यास ह्यांतून व्यंगचित्रकार 'डीझी' चे आगळेपण सिद्ध झाले आहे.

## अंजनी देसाई

ह्यांचे हे पहिलेच चित्रप्रदर्शन! चित्रकलेची उपजत आवड, डिझीचे मार्गदर्शन, निसर्गचित्रांचे वेड, कलांविषयीचा उदंड उत्साह व चांगले प्रोत्साहन यांतून ह्या चित्रकर्तीचे हे प्रदर्शन उभे राहिले. हे पहिलेच प्रदर्शन असले तरी त्यांतला एक भाग मला अतिशय आवडला. "**कलर्स ऑन म.य होरायझन**" हा ! आकाशाची ही विविध रूपे टिपण्यासाठी साक्षेपी दृष्टि हवी. विविध रंगात व रंग मिश्रणात रमता आले पाहिजे. रंगांची किमया आकाशाच्या कन्व्हासवर करून दाखवितां यायला हवी. ह्या आकाश-चित्रांतील '**बरनिंग स्काय, परपल ग्लोरी, एमेराल्ड ॲण्ड ब्ल्यू, गोल्डन ऑर्ब, ब्ल्यू नाईट** ही चित्रे मोहक वाटली. पळत्या ढगांचे चित्रहि सजीव वाटले. निसर्ग चित्रांतली ऋतुचित्रे व द ग्रूप चित्र उल्लेखनीय! ह्या नवोदितेच्या चित्रांत मला रंगांची कुसर अधिक आवडली. नीटसपणा, यथातथ्यता मनांत भरली.

आकाशवाणी मुंबई केंद्र, वेळ रात्री साडेनवाची ! वार बुधवार ! आतां ऐका साप्ताहिक कार्यक्रम —ओळखलात ना! तुतारी ! तुतारी वाजली (आणि दर बुधवारी वाजते) कार्यक्रम सुरू झाला. दर बुधवारी हा कार्यक्रम होतो. पण त्या कार्यक्रमाला 'तुतारी' हे नांव मात्र कां दिले जाते कळत नाहीं. ते एक सरकारी मुखपत्र असते. आणि विषय – विषयाचं बंधन तुतारीला हवंच काय! –सूर्याखालचे सर्व कांहीं! अर्थातच हा सूर्य म्हणजे भारतीय शासनाचा हे सांगणे नलगे! त्यांत कुटुंबनियोजन ते अल्पबचत सारं कांही चालतं. (आणि खपतंही) त्यांत नसते फक्त 'तुतारी' आणि तुतारीची प्रेरक, उत्साहक शक्ति! त्या सादर करण्यांतही कांही शैली नसते. नवरा बायको व एक भावजी यांच्या तोंडी साधारणपणे सारी 'छापील' माहिती कोंबली व ही पंधरा मिनि-टांत हंसणं वगैरे मिसळून पुरविली कीं जे कांही 'प्रॉडक्ट' तयार होतं त्याचं नांव तुतारी! ऐन युद्ध काळांतहि ही तुतारी फारशी उत्तेजक नव्हती आणि आतां तर काय – जय तारकंद! कल्पकता-शून्य निमितीमुळें हा 'पदार्थ' आतां 'बेचव' व 'नीरस' झाला आहे हे आकाशवाणीच्या ध्यानीं येत नाहीं काय ! आपलेच 'प्रॉडक्शन' न ऐकण्याची अट तर तिथे नाहीं ना !

कल्पक निमितीचा प्रयत्नही आकाशवाणीवर होतो. मग 'रेडियो' असल्याचे समाधान वाटते. उदाहरणार्थ कथा आणि श्रुति कथा हा कार्यक्रम! कार्यक्रमाची कल्पना चांगली. कथांची निवड कोण व कशी करतो ते ठाऊक नाही. **शं. ना. नवरे** (शालू) **जितेन्द्र अभिषेकी** (अनजाणा) **पद्माकर गोवईकर** (डोके दुःखी) **गंगाधर गाडगीळ, वि. आ. पत्की** (सावन घन गरजे) ह्या कथांच्या श्रुतिकथा मी ऐकल्या तशी कुठल्याही कथेची श्रुतिकथा होऊं शकेल. पण मुळांतच एखाद्या कथेत 'नाटय' असेल तर ती कथा प्रभावी ठरूं शकते हे नवरे, अभिषेकी, गाडगीळांच्या कथेत दिसून आले. ह्यांत अगदी परिणामशून्य, नीटस निवेदन केले पत्कीसाहे-बांनी! लेखकच निवेदनासाठीं असावा ही रांगणेकरांची कल्पना चांगली. पण सर्वच चांगल्या कथांना 'चांगला' निवेदक न मिळाला तर ? पत्कींची कथा चांगली असूनहि ती चांगली श्रुतिकथा ठरली नाहीं! त्या दृष्टीने गाडगीळ-नवरे अग्रेसर ठरले. अभिषेकी यांच्या कथेत 'गायकी' ला चांगला वाव होता. विशेषतः 'संगीत' हाच त्या कथेचा विषय असल्याने व अभिषेकी गुणी गायक अस-ल्याने त्यांनी ती श्रुति कथा—श्रुति मनोहर केली असती तर रसिक श्रोत्यांनी 'दाद' नक्कीच दिली असती. ह्या श्रुति कथांत 'दीपावली'च्या तीन कथांना स्थान मिळाल्याने 'आकाशवाणी'-वर कांही गटबाजी आहे की काय अशा संशोधनात बरेचसे साहि-त्यिक–कथाकार गुंतले असल्याने तूर्त कथांना, 'बहर' येई-नासा झाल्याचे ऐकीवात आहे. कांहींनी 'माझी कथाही कशी चांगली आहे' हे पटवून देणारे अर्ज आपापल्या 'वकीलांमार्फत' पोह-चते केले असल्याचेही कळते. चांगल्या कथांबरोबर चांगले 'निवेदक' घ्या बुवा ! तूर्त इतकेच ! !

आणखी एक चांगला उपक्रम! राष्ट्रीय कार्यक्रमात गुरु-शिष्यांना एकत्र आणून संगीताच्या रसिकांना आकाशवाणीने आगळा दिलासा दिला आहे. यांत केवळ 'गायकी'च नाहीं तर वादकांनाही स्थान आहे हे उत्तम ! वर्षानुवर्षे नुसती नांवे ऐकूं येतात. पण विनायकबुवांच्या बरोबर त्यांचा मुलगाही जेव्हां 'ऐकूं' येतो तेव्हां गायकीचे वेगळेपण, जडणघडण आणि साधना ध्यानी येते. अखिल भारतीय संगीत परिषदेचे जणुं छोटेसे प्रात्य-क्षिकच! ! हिराबाईच्या बरोबर प्रभा अत्रे गायल्या. वय, तयारी, अनुभव व अभिजात गोडवा ह्यामुळें हिराबाईच्या गाण्यांत मजा आली. पण प्रभा अत्रे यांच्या गाण्यांतही हिराबाईचे चांगले गुण प्रत्ययास आले. संगीत सभेबाबतही ही कल्पकता ही प्रयोग-शीलता दाखविल्याबद्दल 'आकाशवाणी' चे अभिनंदन.

'ध्वनिचित्र' हे सरकारी पातळीवरून खाली येईल काय! 'समयसंवाद' म्हणजे शिवाजी पार्कवरील सभा नव्हे हे सदानंद वर्दे ध्यानीं घेतील काय ! 'समयसंवादा'त कांहीं नवे आवाज ऐकूं येणार नाहींत काय ! शिरीष पै आणि रमेश तेंडूलकर 'आकाशवाणी' वर एवढे भारावून कां बरे बोलतात ? 'भावसर-गम' मध्ये 'बसणाऱ्या' कवींची यादी विशाल (व विशाल दृष्टिकोनांची ) होईल काय ? उगीच विचारलं झालं. माझा 'इंटेरस्ट' नाहीं कारण मी आहे एक 'गद्य' माणूस ! ! आपले चार लोक बोलतात ते सांगितलं येवढंच!

—बन्डाबापू











## धीमंत धनंजयराव

साधी राहणी आणि उच्च विचारसरणी ह्या गोष्टी आज क्वचितच एकत्र आलेल्या आपणांस दिसतात. विशेषत: "एक नूर आदमी दस नूर कपडा" ह्या टेरिलिन-नायलॉनच्या जमान्यांत असामान्य कपडयांत गुरफट-लेली अति सामान्य माणसेंच पदोपदी ठेंचकाळतांना दिस-तात. आजचा बराचसा जमाना 'साधने'च्या ऐवजी 'प्रसाधनां'चाच दिसतो. त्यामुळे जिथे 'साधना' दिसते. तेज दिसते. वैभव असूनही निरहंकारित्व दिसते. सारे 'उच्च'ही जेव्हां 'साधे'पण लेवून स्वयंतेजाने मिरवतांना दिसते तेव्हां मान नत होते. सुगंधाला जाहिरात लागत नाही. सूर्याला 'डिंडिम' लागत नाही. बुद्धिवैभवाला वकिली लागत नाही. ती स्वत:च 'बोलकी' असते. ती कमी बोलते पण जे बोलते ते सारे 'मौलिक' असते. शब्दांना भाव असतो. अर्थ असतो. तो इष्ट परिणाम करून जातो.



डॉ. डी. आर. गाडगीळ

श्री. धनंजयराव गाडगीळ यांच्यासंबंधी हे मी लिहीत आहे. डॉ. धनंजयराव गाडगीळ हे नांव माहीत नसलेला महाराष्ट्रीय मिळणे अशक्य आहे असे मला वाटते. त्यांचे मौलिक विचार ही एक आर्थिक क्षेत्रांतली धन-संपत्ति आहे. सहकाराच्या क्षेत्रां-तले त्यांचे स्थान हे एखाद्या तपस्व्याचे–भीष्माचार्यांचे आहे. अर्थकारणांत त्यांच्या शब्दांना फार मोठा 'अर्थ' आहे. नियोजना-बाबत त्यांचे मार्गदर्शन महत्वाचे मानले जाते. महाराष्ट्राच्या राजकारणाशी–प्रत्यक्षरीत्या–त्यांचा संबंध आलेला नसला तरी महाराष्ट्राची निर्मिती (सं. महाराष्ट्र चळवळ) व महाराष्ट्राचा आर्थिक विकास, सहकारी कारखाने, नॅशनल को-ऑपरेटिव्ह डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन ह्या कार्यांच्या रूपाने त्यांचा महत्त्वपूर्ण संबंध आलेला आहे. शिक्षण आणि संशोधन ह्या दोन गोष्टींत धनंजयरावांना प्रथमपासूनच 'रस' वाटत असल्याने सरकारी नोकरीची 'सोनेरी' (वाटणारी) बेडी त्यांनी फार लवकर झुगारून दिली. सुरतच्या एम. टी. बी. कॉलेजचे प्राचार्य म्हणूनही त्यांनी काही काळ काम केले. परंतु त्यांच्या बुद्धीला ते क्षेत्रही मर्यादित वाटूं लागले. (असावे) बुद्धीची आव्हाने स्वीकारणे. नव नवीन कल्पनांना जन्म देणे. त्यांना आकार देण्यासाठी अविश्रांत धडपड करणे. त्यांतील सर्व खांचाखोचांची पूर्व कल्पना घेऊन त्या योजना परिपूर्ण करण्यासाठी परिश्रम करणे आणि मग त्या कल्पनांचा समर्थ पुरस्कार करणे ही गोष्ट धनंजयरावांच्या स्वभावांत आहे. त्यामुळेच एम. ए. एम. लिट्. ह्या पदव्या संपादन करून आल्यावर 'पदवी-संतुष्टता' त्यांना स्पर्श करू शकली नाही. तर पदवी संपादन हा त्यांनी कार्यारंभ मानला. सर्व्हंटस ऑफ इंडिया सोसायटीच्या गोखले इन्स्टिटयूट ऑफ पॉलिटिक्स अॅण्ड इकॉनॉमिक्सचे ते संचालक झाले. त्या संस्थेला आज अखिल भारतीयच नव्हे तर जागतिक कीर्ति मिळाली आहे. त्याचे श्रेय धीमन्त धनंजय-रावांचे आहे. त्यांच्या नेतृत्वाखाली व मार्गदर्शनाने त्या संस्थेने भारताच्या आर्थिक समस्यांचे केलेले संशोधन हे 'अधिकारी' संशोधन मानले गेले आहे. १९२४ साली त्यांनी **इंडस्ट्रिअल इव्होल्यूशन ऑफ इंडिया** हा ग्रंथ प्रसिद्ध केला. त्या ग्रंथाच्या तीन आवृत्त्या निघाल्या असून ते भारतीय व पाश्चात्य विद्यापीठात पाठ्यपुस्तक म्हणून नियुक्त केले आहे. गेल्या ३६ वर्षांत त्यांनी अर्थशास्त्र व राज्यशास्त्र या विषयांना मौलिक संशोधनाबाबत असंख्य विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केले आहे. तसेच स्वत:ही महत्त्व-पूर्ण ग्रंथरचना केली आहे. इकॉनॉमिक पॉलिसी अँड डेव्हलपमेंट, इंडियन प्लॅनिंग, प्लॅनिंग अँण्ड इकॉनॉमिक पॉलिसी, टोवर्डस् द को-ऑपरेटिव्ह कॉमनवेल्थ ह्या ग्रंथांचा आवर्जून निर्देश करतां येईल.

सहकाराचे क्षेत्रांत तर आज त्यांचे नांव शिखरपदी विराजते आहे. पुण्याच्या जिल्हा सहकारी बँकेचे एक संचालक व नंतर अध्यक्ष म्हणून ते सहकारी बँकांचे क्षेत्रांत आले. आणि १९६० पासून ते राज्य सहकारी बँकेचे अध्यक्ष म्हणून काम करताहेत. महाराष्ट्राचा पहिला सहकारी साखर कारखाना १९५४ साली प्रवरा नगर येथे त्यांच्याच कर्तृत्वाने सुरू झाला. त्या कारखान्याने सहकारी साखर कारखान्यांच्या नेतृत्वाचा ध्वज जणुं हाती धरला आणि आता महाराष्ट्राचा सारा साखर निर्मितीचा धंदा सहकाराच्या निशाणाखाली आला आहे. अन्य प्रांतांनीही हे नेतृत्व आता स्वीकारले आहे. "पीक कर्ज योजना" ही त्यांची व शेतकऱ्याला पिकांसाठी लागणारे सारे कर्ज सहकारी कार्य कक्षेने पुरविले पाहिजे ही धारणाही त्यांचीच ! 'म्युच्युअल अॅरेंजमेंट स्कीम'च्या सहाय्याने देशांतल्या सहकारी बँकांमध्ये एक सांखळी जुळवण्याचे महत्वाचे कार्य त्यांनी गेल्या वर्षी पार पाडले. मूलभूत आर्थिक समस्यांबाबत 'सहकार' हाच पाया असूं शकतो अशी त्यांची धारणा असल्याने त्यांच्या नेतृत्वाखाली सहकारी बँकांनी आपल्या कार्यकक्षा विस्तृत केल्या. रिझर्व्ह बँक व सहकारी बँका






यांच्यात सतत दुवा म्हणून डॉ. गाडगीळांनी जी महत्त्वपूर्ण कामगिरी केली आहे, ती सहकारी जगताला विसरतां येणार नाही. आपल्या कार्यांत रत असलेल्या धनंजयरावांकडे अनेक बहुमान चालत आले. १९४४ साली भारत सरकारने त्यांना 'कमिटी ऑफ ऑर्गनायझेशन ऑफ अॅग्रिकल्चरल फायनान्स'चे नेतृत्व बहाल केले. त्यानंतर अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय कमिट्यांवर त्यांनी कामे केली ! आता ते पुणे विद्यापीठाचे उपकुलगुरू म्हणून निवडून आले आहेत. अविरोध निवडून आले आहेत. वास्तविक तो मान त्यांनी वारंवार नाकारला होता. परंतु आता गोखले इन्स्टिटयूटमधून निवृत्त झाल्यावर आपल्या आवडीच्या शिक्षणविषयक क्षेत्रांत उच्चपदी ते जात आहेत. 'बुद्धि' कुठेही जाऊन उभी राहिली तरी तिच्या 'प्रभे'ने ती प्रभाव पाडतेच पाडते. पुणे विद्यापीठाचा काही मौलिक 'कायाकल्प' त्यांची प्रज्ञा घडवून आणील याबद्दल तिळमात्र शंका नाही. ह्या निमित्ताने धीमन्त धनंजयरावांचे आम्ही अभिनंदन करतो. ★★

## बदलापूरचे प्रज्ञा पुरुष

**नैनंछिन्दन्ति शस्त्राणि। नैनं दहति पावकः** असे आत्म्याचे वर्णन श्रीकृष्णांनी गीतेत केले आहे. आत्म्याचे तेच वर्णन 'ज्ञाना'च्या बाबतीतही लागू पडते असे मला वाटते. कारण 'ज्ञाना'ला जाळून टाकणे शक्य आहे अशा अहंकाराने प्रेरित होऊन तक्षशीला, नालंदा विद्यापीठे व ग्रंथालये आक्रमक सैन्याने जाळून टाकली. पण वेद अजर राहिले, उपनिषदे अमर राहिली. गीता जळूनही (पुस्तक) गीता तत्व मेले नाही. कारण ज्ञानाचा पराजय ह्या जगात झाला तर मानववंशच मुळी जगू शकणार नाही. ज्ञानाची भूक ज्ञान मिळवून भागत नाही. कारण ज्ञान अपार आहे. अनंत आहे. आता जिंकण्यासारखे काही राहिले नाही असे जगज्जेता शिकंदर म्हणाला तसे ज्ञानियांचे शिकंदर म्हणू शकणार नाहीत. 'ज्ञान संपले' असे कधी होतच नाही. म्हणूनच ज्ञानाचे उपासक वयावर मात करू शकतात. वार्धक्य त्यांना विचलित करू शकत नाही. बदलापूरसारख्या एका लहानशा गांवी स्थायिक झालेला असाच एक ज्ञानयोगी मी जेव्हा पाहतो, तेव्हा तो चिरतरुण. असल्याचा साक्षात्कार मनांला होतो. नानासाहेब चापेकर ह्यांना नुकतीच पुणे विद्यापीठाने **'डॉक्टर ऑफ लिटरेचर'** (डी. लिट्) ही उपाधी बहाल केली. योग असा की, ज्या दोघांना ह्या पदव्या देण्यात आल्या ते दोघेही ज्ञानयोगी, दोघेही वयाने शंभरीच्या घरातले. दोघांची साधना मोठी आणि दोघांची कार्यक्षेत्रे भिन्न असली तरी दोघांनीही महाराष्ट्राला 'मोठे' केलेले ! ही पदवी देऊन विद्यापीठाने जणु आत्मगौरवच करून घेतला आहे. त्या कार्यक्रमाला खास 'पुणेरी' पोषाख करून नानासाहेब वयाच्या ९८ व्या वर्षी जातीने उपस्थित होते. खणखणित आवाजात त्यांनी भाषणही केले. नानासाहेबांच्या ह्या 'तारुण्या'चे रहस्य त्यांच्या अखंड उपासनेत असावेसे मला वाटते. मागे ठाण्याला झालेल्या मराठी साहित्य संमेलनाचे उद्घाटनाचे वेळी उद्घाटक म्हणून नानासाहेबांनी जे भाषण केले ते ( मुळातच कार्यक्रमाला फार उशीर झालेला असल्याने ) लांबलेले असे वाटलेही. पण त्या व्याख्यानात त्यांचे चतुरस्त्र वाचन, त्यांची प्रज्ञा व बेडर चिकित्सा मात्र जाणवली ( व आवडलीही) बदलापूरला ते रहात असले तरी आपल्या वाढदिवसाचे निमित्त करून किती तरी वर्षे ते एक नव्या-जुन्यांचा साहित्यिक मेळावा तिथे भरवीत. सहवासाने विचारमंथन घडते व ज्ञानाच्या कक्षा विस्तारतात ही जाणीव हा प्रज्ञातरुण माणूस ठेवतो, ह्यातच त्याच्या वृत्तीची झेप व आगळेपणा जाणवतो. समाजशास्त्रीय, मूलगामी अभ्यासाची वृत्ति असल्याने त्यांच्या लेखनालाही त्यांच्या प्रमाणेच एक 'व्यक्तिमत्व' लाभले आहे.

**"आमचा गांव बदलापूर"** ह्या पुस्तकातही त्यांची संशोधक वृत्ति दिसून आली. तशीच ती त्यांच्या **"पेशवाईच्या सांवलीत"** ह्या सारख्या लौकिक दृष्ट्या "किरकोळ" वाटणाऱ्या पुस्तकातही दिसून येते. दुसऱ्या पुस्तकांत 'जमाखर्चा'च्या वह्यांतून काही सामाजिक, आर्थिक, राजकीय विचिकित्सा अवतरली आहे. **'निवडक लेख'** (१९२४) **वैदिक निबंध** (१९२९) **समाज नियंत्रण, तर्पण, रजःकण साहित्य समीक्षण, चित्पावन, चापेकर** हे आणखी काही ग्रंथ आणि बदरीकेदार, हिमालयात, काश्मीर (प्रवास वर्णने) पैसा, गच्चीवरील गप्पा, बर्क चरित्र ही आणखी काही साहित्य निर्मिति !! त्यांनी इंग्रजीतही विपुल लेखन केले आहे. पण त्याचा संग्रह होणे मात्र आवश्यक आहे.

उंच, शिडशिडित, नाकेली व नाकावर चष्मा, डोक्यावर लाल पगडी, अंगात कोट, उपरणे परिधान केलेला हा ज्ञानयोगी अजूनही तरुणाच्या तडफेने ज्ञानोपासना करीत आहे. अग्नीने अग्नी प्रज्वलित होतो. ज्ञानाने ज्ञान वाढते. साधनेने शान वाढते. ना. गो. चापेकरांनी मराठी 'प्रज्ञे'ची शान राखली आहे. ह्या प्रज्ञापुरुषाचा यथोचित गौरव पुणे विद्यापीठाने केला आहे. आम्हीही त्याला व त्यांच्या साधनेला अभिवादन करतो.

--आदित्य












## बंद ! बंद !! सबकुछ बंद !!!

**केरळ** बंद ! बंगाल बंद ! पंजाब बंद ! ! गिरण्या बंद ! ! मुंबई बंद ! राजस्तान बंद ! अरेच्या ! अजून बरेच प्रांत बाकी राहिले की ! ह्या प्रांतातले लोक वृत्तपत्रे वाचीत नाहीत काय ? त्यांना भरपूर बोनस मिळतो काय ? त्यांना खुल्यां बाजारांत हवा तेवढा व हव्या त्या दराने तांदूळ, गहूं मिळतो काय ? रॉकेलच्या टाक्या चौकाचौकांत ठेवल्या जातात काय ? साखरेची पोती गाडीवर घालून रस्त्यावर विकली जातात ? पगाराच्या नोटा हव्या तशा मिळतात काय ? काय आहे काय ? अजून 'बंद'च्या घोषणा झाल्या कशा नाहीत ? पंडितजी गेले. शास्त्रीजी हरपले आणि इंदिराजी आतां पंतप्रधान झाल्या आहेत हे बंगाल–केरळप्रमाणे त्यांना कळले नाही काय ? बंगालमध्ये, केरळमध्ये, मुंबईमध्ये जे प्रकार झाले त्यांनी त्यांच्या भावना अजून भडकत नाहीत ? नाही ! लोकहो त्यांची वृत्ति शांत आहे. . . आपल्याच माणसांवर पाठीमागून वार करणे त्यांना ठाऊक नाही. आपल्या निष्ठा परक्यांना विकून देशातल्या प्रगतीवर संकटांचे भांडवल करून वार करणे हे त्यांना ठाऊक नाही. विदेशांचे मलिदे खाऊन, त्यांची भाटगिरी करून, त्यांच्याच शब्दावर लोकयुद्ध, लोक राज्य ठरविण्याइतकी बौद्धिक कंगालता त्यांना आली नाही–नवी राजवट आली. देशाचा महापुरुष काळाने ओढून नेला. युद्धाने आर्थिक विकासाची बैठक खिळखिळी झाली. शत्रू सीमेवर उभे आहेत. जगांत भोंवती लष्करी क्रांत्या होताहेत. नवे निर्णय घेणे आवश्यक आहेत अशावेळी 'परिस्थिति' साधून वार करण्यात कम्युनिस्ट वाकबगार असतात. आणि गृहमंत्री नंदांनी नांव न घेतले तरी ह्या सर्व घटनांमागे एक संघटित पक्ष आहे ही गोष्ट त्यांनीही मान्य केली आहे. इंदिरा गांधींच्या राजवटीची सुरुवात मोठ्या विचित्र परिस्थितीत झाली आहे. केरळांत जे प्रकार झाले, तेच आतां बंगालमध्ये चालूं आहेत. त्यांची 'जात' एक आहे. मुंबईच्या संपांतहीं तीच दिसून आली आहे. संपात नेमके काय साधले ? कामगारांचा नेमका फायदा किती झाला? झालेल्या गोळीबारांत किती 'पुढारी' जखमी झाले वा मेले? घरे, ऑफिसे, गाड्या, बसेस जाळून कुणाच्या पोटांत किती 'तांदूळ' गेला वा कितींचा 'अन्नप्रश्न' सुटला? अन्न समस्या ही घोषणांनी वा जाळपोळीने सुटणारी समस्या नाहीं. पण रान पेटवणे आणि शासनाला हिंसक प्रकारांनी जेरीस आणणे, हतबल करणे. ते खिळखिळे करणे. हाच ह्या दंडेलीच्या मागचा हेतु असतो. कामगार काय किंवा जनता काय अखेर कशातून काय साधते हा विचार करीत नाहीं. आणि वळाचीच भाषा शासनाला कळते असे व असेच वारंवार शासनाचे बाबतीत घडले आहे. आंध्राची निर्मिती ह्यांतूनच झाली. महाराष्ट्राचे वेळी हेंच घडले. मद्रास मधल्या भाषिक दंगलीची हीच कथा आहे. बंगालमध्ये तर ही आवृत्ति नेहमीच निघते. केरळ मध्यें अत्याचाराचे उत्तर म्हणून सर्वदूरून 'तांदूळ' धांवला. पंजाबी सुभ्याबाबतही तारासिंग–फत्तेसिंगांनीं 'शस्त्र' उपसले उपोषणाचे आणि झटकन 'हो'कार मिळाला. दंगली करूनही नागानेते सन्मानपूर्वक दिल्ली दरबारी बोलावले जातात हे पाहून मिझो बंडखोर 'क्रियाशील' होतात. संप, जाळपोळ, लुटालूट, उपोषण, गाड्या उडविणे हे समस्या सोडवून घेण्याचे 'राजमार्ग' होऊं पाहताहेत. वांदोडकर, वेळगांवकरांचे लोकशाही मार्ग मात्र 'दप्तरी' 'आणीवाणी'ची ऊब खात पडून आहेत. 'अजून योग्य वेळ आली नाही' असे 'श्रीमंत' म्हणतात. पण जनतेच्या मनांत यातून वैफल्याची भावना पसरते आणि वैफल्यातून मग कटुता व कटुतेपोटी विवेकशून्य अत्याचार जन्म पावतात हे शासनाने ओळखले पाहिजे. दुसराही एक विचार येथे मांडावासा वाटतो तो असा कीं, ह्या सर्व चळवळीत तरुण विद्यार्थी वर्ग सातत्याने आघाडीवर दिसतो ही गोष्ट भयप्रद आहे. तरुणांच्या शक्ति आज अत्याचारी मार्गांत वांया जात आहेत. आणि आम्हीं म्हणतो कीं, विद्यार्थ्यांनीं राजकारणांत पडूं नये. आज ह्या तरुणांच्या समोर कांहीं भव्योदात्त घडतांना दिसत नाहीं. खुज्या नेत्यांचे खुजे अनुयायी एवढीच भूमिका उरते आणि त्यांतून घडतो केवळ अविचार! नेत्यांनीं विधायक व लोकशाहीनिष्ठ मार्गाने प्रश्न सुटूं शकतात हे वर्तनाने जर दाखवून दिले तर अत्याचारी मार्गांनीं 'उत्तरे' मिळविण्याचा हा 'दंडेली' चा मार्ग टिकूं शकणार नाहीं. ह्या मार्गांना नमण्यानें आपण लोकशाही निष्ठांना हास्यास्पद करतो हे शासनाच्या ध्यानीं येत नाहीं काय? कम्युनिस्टांनी ह्या योजनाबद्ध दंगली घडवून आणल्या आणि 'इंटक' मात्र मार खाऊन हास्यास्पद ठरली हे मुंबईत दिसले. ह्या सर्व प्रकरणांतून बोध घेऊन शासनाने गोवा व बेळगांव कारवार प्रकरणी लोकशाहीचे सर्व कौल सिद्ध केलेल्या जनतेला न्याय दिला तर शासनाची शान वाढणार आहे. भारतात एक लोकशाहीनिष्ठ शुद्ध परंपरा निर्माण करण्याचे श्रेय त्याला मिळणार आहे. अन्यथा 'लोकशाही श्रद्धा'च संकटात सांपडलेली शासनाला पहावी लागेल.

## कांहीतरी आगळे, क्रांतिकारक (ही)

**मराठी** मन मोठें सृजनशील. कल्पक. विचिकित्सक आणि कांहीसे छांदिष्टही. त्या मनांत नव्या जुन्याचा मोठा संघर्ष चालूं असतो. **'कांही तरी नवेच करा' मरावे परी कीर्ति रूपे उरावे** वगैरे संदेश सारखे इथें घुमत असतात. इथें संदेशाला तोटा नाही. पुढाऱ्यांची वाण नाहीं. उदंड नाटके फुलतात. साहित्यिक पिकतात आणि त्यांच्याच खांद्यावर स्वतःला बसवून घेऊन 'मासिके'ही उगवतात. कावळ्यांच्या छत्र्यांना जसा 'सीझन' लागतो तशी 'मासिकां'ना सीझनची अट नसते. ती केव्हांही व कुठेही उगवतात आणि 'वाढण्या'चे त्यांच्या हातीं नसल्याने कधी तरी व कुठे तरी ती अस्तंगतही होतात. ती वाढली तर बाळसेही धरतात. आणि त्यांनीं तसे बाळसे धरावेही. पण कांहीं कांहीं मासिके जन्मतःच आपण अंजनीसुताप्रमाणें सूर्यबिम्ब गिळायची घोषणा करतांना दिसतात पण प्रत्यक्षांत मात्र (निदान दृश्यरूपांत तरी) त्यांचीं ताकद बुंदीचा लाडू एका दमांत गिळण्याची (व पचविण्याचीही) दिसत नाही. तेव्हां मात्र मनाला गंमत वाटते. प्रत्येक नवे मासिक निघतांना "आजच्या मराठी मासिकाकडे व साहित्याकडे पाहिले कीं ह्याला झाले आहे तरी काय ? छेः छेः भारीच चिंताजनक हो ही परिस्थिती" म्हणून आक्रोशत उठते आणि "ही विटंबना थांबविलीच पाहिजे." अशी प्रतिज्ञा करून जन्म घेते. त्यासाठी ज्या सुइणी बोलावल्या जातात त्या त्यांच्यातल्याच मायकरणी म्हणून!! आणि मग 'हें आगळे' 'हे क्रांतिकारक', हे नवीन, सर्जनशील, व्युत्पन्न वगैरे सारे बासनात राहते आणि मग सुरूं होते तडजोड आणि मग तडजोडीच बनते तत्वज्ञान ! आणि मग ते बोलू लागते सामान्यांना समजेल अशा सामान्य भाषेंत! मासिके आहेत तिथेच राहतात. मराठी साहित्याची उंची व खोली (व आणखी कांहीतरी) होते तिथेच राहते. विटंबना चालूंच राहते (मग ती फारशी खुपेनाशी होते) आणि मग प्रतिमासी एक 'रूटीन' व व्यवहार' पाळला जातो—मासिक वाढदिवसाच्या पद्धतीने ! अखेर हे मनांतले वरेचसे आगळे–क्रांतिकारक–उंच आणि खोलही पुष्कळदा कुठेतरी 'खोलच' जाऊन पडते—अशा ठिकाणी कीं, जिथून हात देऊन काढणेही कठिण पण तरीही अशी 'प्रतिज्ञा' वारंवार कानीं पडतेच आहे. 'मनोगतें' लिहिली जातच आहेत. हाडाचा क्रांतिकारक बारा वाजून चाळीस मिनिटांनी अशा मार्गाने, अशा पद्धतीने क्रांति येत आहे अशी घोषणा करीत नाहीं त्याची क्रांति अंगांगातून ठिबकते. तिचा अंगार उरांत नव्या उर्मि पेटवतो आणि त्याचे साहचर्य हे किमया करून जाते. अलिकडे बाजारात सर्व प्रकारचे वेष मिळत असले आणि काही काळ ते मोहक वाटत असले तरी क्रांतिकारकाला वेष नसतो. त्याला असते व्यक्तित्व ! स्वतंत्र, स्वयंपूर्ण ! ते ठसा उमटवूनच जाते. बाकीचे घोषणा करीतच राहतात–मीच तो क्रांतिकारक अमुक अमुक! मराठी मासिकांनी (व वाचकांनीही) असे अनेक 'क्रांति प्रयत्न' पाहिले आहेत. आणि त्यांचे यथायोग्य स्वागतही केले आहे. तरीही प्रत्येक नवा प्रयोग "मागच्या कुणालाही कांहीही जमले नाही. आतां मी किमया करतो बघा!" अशीच ग्वाही देत येतो आहे. मला मात्र नेहमी हे पाहिलं की वाटतं, कराना तुम्हांला काय करायचं ते! जगन्नाथ एक मोठी चाळणी घेऊन बसला आहे. साऱ्यांना तो ती लावतो आहे. आपण फक्त प्रयत्न करूं या झालं. युगप्रवर्तक, क्रांतिकारक वगैरे गुळगुळित झालेली नाणी कशाला उगीच खेळवत बसायचं? ठरवूं द्या त्यालाच सारं कांहीं!!

सूर्यबिंब ग्रासायला जाणारा मारुति 'वायुपुत्र' होता एवढंच लक्षांत ठेवूं म्हणजे झालं!!

**—सारस्वत**













चुरचुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण

### त्यात काय आहे ?

छोटा बाळू शाळेतून घरात येताच दफ्तर टाकून दारातूनच आईला म्हणाला, "कम हियर मम्मी !"

ते ऐकून त्याचे वडील म्हणाले, "बाळू, बरंच इंग्रजी शिकलास की !"

"मग ! बाबा, मला तुम्ही आता इंग्रजीतून काहीहि बोलायला सांगा" बाळू आईजवळ येत फुशारकीने म्हणाला.

"बरं तर," बाबा म्हणाले, "आईला इथून दाराकडे जायला इंग्रजीतून कसं सांगशील ?"

ते ऐकून क्षणभर विचार करीत बाळू म्हणाला, मी पुन्हा दाराकडे पळत जाईन नि तेथून म्हणेन, "कम हियर मम्मी !"

★ ★

### आत्ता होतं आणि—

पत्र लिहिता लिहिता तो एकदम थांबला. ते पाहून तिने विचारले, "काय झालं ?"

"आता एवढ्यात माझ्या जिभेवर होतं आणि आता नाही." तो म्हणाला.

"काही हरकत नाही. थोडा विचार कर, पुन्हा आठवेल."

"तसं नाही. पोस्टाचं तिकीट होतं ते." ★ ★

### तोपर्यंत थांबेन

न्यायाधीश—(फांशी जाणाऱ्या मनुष्यास) "तुझी शेवटची इच्छा पूर्ण करणे माझे कर्तव्य आहे. तेव्हा तुझी काय इच्छा आहे ते सांग ?"

"माझी शेवटची इच्छा आंबे खाण्याची आहे," त्या मनुष्याने उत्तर दिले.

"पण आंबे यायला तर अजून सहा महिने अवकाश आहे !"

"काही हरकत नाही ! तोपावेतो माझी थांबण्याची तयारी आहे." ★ ★

### मग ठीक तर !

"कां हो ! इथे जवळपास कोणी पोलिस शिपाई नाही काय ?"

"नाही बुवा. कां ?"

"मग ठीक आहे. आपण आपले पेन आणि मनीबॅग माझ्या हवाली करा !" ★ ★

### उपाय की अपाय ?

"हा कडा फार धोक्याचा आहे. तुम्ही येथे धोका दर्शविणारी एखादी पाटी कां लावत नाही ?" एका प्रवाशाने विचारले.

"तुम्ही म्हणता ते बरोबर आहे. आम्ही पूर्वी येथे अशी एक पाटी लावली होती. परंतु येथून कुणीच खाली पडले नाही, म्हणून आम्ही ती काढून टाकली." संबंधित व्यक्ति उद्गारली.

★ ★

### अगदीच सोपं !!

एका बड्या परदेशी प्रवाशाला प्राणिसंग्रहालयाचा व्यवस्थापक सर्व प्राणी दाखवत फिरत होता. दाखवता दाखवता ते दोघे एका पिंजऱ्याजवळ आले. त्यात एक वाघ व एक शेळी एकत्र ठेवलेली होती.

"वाघ आणि शेळी ?" तो प्रवासी आश्चर्याने उद्गारला, "अरे वा ! सहजीवनाचं हे फार चांगलं उदाहरण आहे. तुम्ही हा चमत्कार कसा साधला बुवा ?"

"आम्ही पिंजऱ्यात दररोज एक शेळी ठेवतो." त्या व्यवस्थापकाने खुलासा केला. ★ ★

### कारण

"ह्या खिडकीसमोर बाहेर पहात उभे रहा आणि तुमची जीभ दाखवा पाहू." एक डॉक्टर आपल्या पेशंटला म्हणाले.

"कां ?" डॉक्टरच्या ह्या चमत्कारिक बोलण्याचं आश्चर्य वाटून पेशंटने विचारले.

"कारण, समोरच्या रस्त्यावरचा डॉक्टर माझा प्रतिस्पर्धी आहे." डॉक्टरने खुलासा केला. ★ ★

### खाऊ

एका खेडवळाला प्रथमच इस्पितळामध्ये आणले होते. त्याला काही खायला दिले होते काय याची तपासणीच्या वेळी डॉक्टरांनी सहज चौकशी केली. त्याने सांगितले, "सकाळी एका बाईने फक्त एक काचेची नळी थोडा वेळ चोखायला दिली होती."

★ ★

### हटकून गुण

"आजकाल बाळासाहेब रात्री लवकर घरी येतात. तुम्ही त्यांची ही सवय कशी खोडली." सुशीलाबाईंना रमाबाईंनी विचारले.

"एका रात्री ते फार उशीरा आले. मी अंधारातच त्यांना विचारले, "कोण ! वसंतराव आहात काय ?" सुशीलाबाई म्हणाल्या.

"पण तुमच्या यजमानांचे नांव तर.........."

"होय, गोपाळराव आहे." सुशीलाबाईंनी मध्येच उत्तर दिले.

—श. शि. पेंढारकर





अनुक्रमणिका

[पृष्ठ ९ वरून – **वामन चोरघडे**]

फेअर कॉपी मात्र मी स्वतःच करतो. ती करतांना मग त्यांत प्रत्येक शब्दाबद्दल 'मी' दक्षता घेतो. काही गाळतो, काही नवे घालतो. मी स्वतःचे समाधान होईपर्यंत कथा प्रसिद्धीसाठी पाठवीत नाही. फेअर करीत असतांना एखादे वाक्य-एखादी चांगली उपमा सुचते. लेखनांतल्या सौंदर्याचा आनंद मात्र जाणवतो. लेखनात शैलीला, प्रयत्नांना, कलात्मक सौंदर्याला फार महत्त्व असते असे मला वाटते.

प्रः– लेखनाच्या Process संबंधी कांही सांगता येईल काय ?

चोः–सांगणे फार कठिण आहे. Complicated आहे ती! एका वेळी एकाहून अनेक गोष्टींचा विचारही चालू असतो. एखादी गोष्ट लिहायला घेतल्यानंतर मध्येच दुसरीही strike होते. मग तिचे लेखन सुरू होते. काही निश्चित सांगणे कठिण आहे.

प्रः– First writing मध्ये पसंत न पडलेल्या कथांचे आपण काय करता ? पुनर्लेखन वगैरे करता की सोडून देता ?

चोः–अगदीच जमली नाही तर फाडून टाकतो. पण सुदैवाने मला तशी वेळच आली नाही. काही कथा मी परत लिहिल्या पण त्या 'चेतना'त लिहिल्या होत्या. अमरवेल, गंगा पण आटली ह्या कथा मी पुन्हां लिहिल्या. पण, सहसा नंतरच्या काळांत मात्र तशी वेळ आली नाही.

प्रः– कथा लेखनांत Expansion चे अनेकविध प्रयोग आपण केले आहेत असे जाणवते. हे प्रयोग consciously होतात की अनुभवांची अभिव्यक्ति होत असतांना आपापला form घेऊन येतात ?

चोः–एखादी कथा सुचल्यानंतर कुठल्या Form मध्ये ती मांडावी ह्या संबंधीचा विचारच मला अधिक त्रास देतो. इतरांच्या कथा वाचतांना सुद्धां माझ्या मनात विचार येत राहतो तो Form चाच ! कलात्मक अभिव्यक्ती संबंधीचाच ! मी अडतो तिथे–त्याच्या चिंतनातच माझा अधिक काळ जातो.

प्रः– आपल्या कथा लेखनाला आपण केलेल्या प्रवासाचा कितपत उपयोग होतो ?

चोः–खूप उपयोग होतो. वेगवेगळ्या तऱ्हेतीची माणसे भेटतात–त्यांच्या कथा गवसतात. अर्थातच हा प्रयत्न Conscious effort नसतो. सहज ते घडून येते इतकेच !

प्रः– १९४२ च्या चळवळीत आपण भाग घेतला. तुरुंगवासही आपल्याला घडला. त्याचा लेखनाचे दृष्टीने फायदा झाला असेलच की !

चोः–झाला तर ! त्या काळांत मी पुन्हा शरीर कमाविले. खूप वाचन केले. खूप जवळून मोठमोठी माणसे पाहिली. काहीं संवयी सोडण्याचे दृष्टीने त्या काळाचा मला उपयोग झाला. त्या काळांतच वेळेचे महत्वही कळले. त्यामुळे मी vacant कधीच नसतो. आगगाडीत सुद्धां मी कधी रिकामा नसतो. डब्यांत साधारण ओळखीचा कुणी दिसणार–भेटणार नाही अशी जागा पाहून मी बसतो ! करमत नाही. कंटाळा आला. असे माझ्या बाबतीत कधीच होत नाही. वेळ कधी व कसा उपयोगात आणता येईल याबद्दलच मी अधिक दक्ष असतो. 'कर्तव्य' भावनेने मी सतत प्रयत्नशील असतो.

प्रः– वर्ध्याला आपण गांधीवादी वातावरणांत राह्यलांत. आपल्या साहित्य निर्मितीवर त्याचा काय परिणाम–संस्कार झाला ?

चोः–मी गांधीवादी वातावरणात गेलो नसतो तर असा झालोच नसतो. तेथे मी राह्यलो. कारण तेथले संस्कार हे आपल्या संस्कृतीचे संस्कार होते–ते चांगले होते. गांधीजींनी धर्म सार्वजनिक जीवनांत आणला. गांधीवाद आपल्या संस्कृतीत न्हाऊन निघालेला आहे. माझ्या विचार–भावनांशी ते संस्कार जुळले. मन रमले. तेथल्या कर्मकांडाचा मात्र माझ्यावर संस्कार झाला नाही. तियल्या मंडळीनींही माझ्या बावतीत फार आग्रही भूमिका घेतली नाही. मी त्या काळात वीस वीस तास कामे केली आहेत. जीवनाला त्याच काळांत खूप गति आली.

प्रः– कथा लिहायला बसता तेव्हां त्या कथेचे सारे structure तयार असते का ?

चोः–होय ! संपूर्णपणे उभे राहिलेले असते असे म्हणतां येत नाही. पण बऱ्याच अंशाने उभे राहते हे खरे !

प्रः– कथा लिहितांना कधी तपशील बदलतो काय ?

चोः–अनेकदां असे होते. एखाद्या गोष्टीसाठी राखून ठेवलेली कल्पना, तपशील दुसऱ्या एखाद्या गोष्टीत वापरला जातो. चांगले वाक्य, उपमा, कल्पना इकडची तिकडे होते. कधी एखादी कल्पना खूप आवडते. नोंदून ठेवतो. मग कालांतराने तिची आवड निघूनही जाते. एखाद्या कल्पनेचे आकर्षण वाटते–उदाहरणार्थ, माणूस किती विश्वास टाकू शकतो ह्या कल्पनेवरच गोष्ट लिहायची इच्छा झाली. विश्वास हाच पाया घेऊन लिहावेसे वाटले. पण नंतर मग ती कल्पना 'सल'मध्ये मी वापरून टाकली.

प्रः– कथांच्या शीर्षकासाठी किंवा पात्रांच्या नांवासाठी आपण अडता काय?

चोः–कथांना शीर्षके नंतरच देतो: त्याबद्दल मी आवश्यक तेवढा विचार करतो. पण पात्रांच्या नांवासाठी फार अडावे लागत नाही.

प्रः– आपल्या कथांत आपल्या जीवनांतल्या आत्मचरित्रात्मक भाग कितपत आला आहे?

चोः–थोडा फार येतोच. पण नेमके सत्यच त्यांत येते असे नाहीं. factual गोष्टीचे वर्णन कथांत यावे ही कल्पनाच मला मान्य नाहीं. आयुष्यांतल्या अनुभवांचा उपयोग 'उपयोग' म्हणून मी केला नाही. तसा तो झाला मात्र आहे!

प्रः– आपल्या प्रस्थान व त्या काळांतल्या गोष्टीत चिंतन, उद्‌बोधन असा भाग जाणवतो. सामाजिक उपरोध, उपहास, चीड, तळमळ वगैरे भाग जाणवतो. त्या कथांबाबतची आजची भूमिका काय?

चोः–त्यावेळी तो भाग माझ्यांत फार होता हे खरे आहे. पण 'शैशवस्मृति' सारख्या कांहीं कलात्मक गोष्टीही मी लिहिल्या होत्या. हर्ष, खेद, चीड, ह्या सर्वच भावना त्यावेळी तीव्र होत्या हे खरे आहे. 'चंपाराणी' हे तर काव्यच होते. पण त्यांतही ही तीव्रता होतीच.

प्रः– आपला निबंध लेखनाचा पिंड असूनहि नंतर आपण निबंध लेखन फारसे केले नाही.

चोः–निबंध लेखन सोडलेले नाही. चांगले निबंध मी लिहिले आहेत. शिक्षकाच्या जीवनावर **अध्यापक आणि अध्यापन** हा निबंध गाजला. प्रा. फडके यांनाही तो आवडला. निबंध लेखन करतो. पण आतां त्यात मी रमत नाही. कथेला मी सर्वस्व मानतो. वाङ्मय आणि वाङ्मय सेवक, लोकसाहित्य या विषयांवरही मी चांगले निबंध लेखन केले आहे. निबंधांचें ५०० पानांचे पुस्तक निघू शकेल येवढे निबंध मी लिहिले आहेत. सुमारे दीडशे नभोवाणीवर केलेली भाषणे






आहेत. विषयांची विविधता त्यांत आहे. ते सारे निबंधच आहेत. त्यांचे संकलन झाले नाही येवढे मात्र खरे!

प्र:— सामाजिक, राजकीय कार्यकर्ता म्हणून भूमिका वठवीत असतांना 'ललित लेखक' ह्या भूमिकेशी कांहीं 'संघर्ष' येतो काय?

चो—नाही! कधीच आला नाही. तेथे माणसे भेटतील. अनुभव मिळेल ह्या भूमिकेने मात्र कधी गेलो नाही.

प्र:— आपल्या वाङ्मयीन संसाराकडे आपण कधी वळून पाहतां?

चो:—पाहतो. तशी मला संवय आहे. आढावा घेतो. सारे तारीख-वार नोंदवून ठेवले आहे. जुन्या कथा वाचतांना त्या कथा पुन्हां लिहाव्याशाही वाटतात. पण त्यांच्यावर अन्याय होईल असेहि वाटते. पण शब्दांचा व भाषेचा साक्षेप माझा तेव्हांही होता हे मला जाणवते. नागपूरला आल्यावर मला 'मराठी' यायला लागले. पण लेखनात मात्र अगदी शुद्ध कारभार असल्याचे जाणवते—आजही!

प्र:— Best of चोरघडे असा संग्रह काढायचें ठरले व त्याचे संपादन आपल्यावर सोपवले तर 'चोरघडे यांची कथातल्याच कथा त्यात येतील?

चो:—नाही! त्यांत वेला, मजल, प्रदीप मधल्याही कांहीं कथा घ्याव्या लागतील. मजल, वेला हे संग्रह मला स्वतःला अधिक आवडतात. त्यांतल्या कथा मीच लिहिल्या आहेत कीं काय असा मला कधी कधी प्रश्न पडतो. इतकी त्यातल्या कथांची बांधणी सुरेख झाली आहे.

प्र:— Planned writing म्हणजे ठराविक वेळी लिहिले पाहिजे, नियमित लेखन केले पाहिजे असे आपले मत आहे काय?

चो:—ही कल्पना चांगली आहे. तसे करायला हवे. पण मला कथा स्वतः बसून लिहिण्यापेक्षा आपण—सांगावे व कोणी लिहून घ्यावे अशी खोड लागली. त्यामुळें मला लेखनिक मिळाला तर जमते. त्याच्या सोयीची वेळ हेच मग माझे planning होऊन बसते. आमच्याकडे असे लेखनिक दुर्मिळ आहेत.

प्र:— 'मजल' हा कथासंग्रह आपण १२।४।१९५४ ते २३।९। १९६० ह्या कालावधीत रुसलेल्या कथा कामिनीस" अर्पण केला आहे. त्या काळांतील मूकतेची कांही कारण मीमांसा?

चो:—कौटुंबिक जबाबदाऱ्यांचा ताण, वेळेचा अभाव व निद्रानाश ही कारणे होती. आपले जीवन असे आहे कीं जो काम करतो त्याच्यावरच सारी कामे येऊन कोसळतात. मग त्या बिचाऱ्याला आपले असे जीवन उरत नाही. तो चेंगरला जातो.

प्र:— वाङ्मयीन टीकेचा सृजनशील साहित्य निर्मितीला कितपत उपयोग होतो? आपल्याला कितपत झाला?

चो:—मला फारशी टीका वाचायलाच मिळाली नाही. वाचनच साक्षेपी होत नाही अशी माझी उलट तक्रार आहे. पुसदला माझ्या अध्यक्षीय भाषणात मी 'साक्षेपी मराठी वाचक नाही' हीच तक्रार केली होती.

प्र:— प्रामुख्याने आपण कथेचेच माध्यम वापरले आहे. इतर formsचा आपण विचारच केला नाही कीं कथेवरची निष्ठा हे त्याला कारण होते?

चो:—कथेबद्दलची निष्ठा हेच प्रमुख कारण होय! माझे मित्र व प्रकाशक श्री. रा. ज. देशमुख म्हणाले 'कादंबरी लिहा'. **कालेलकर** म्हणाले "तुमची प्रतिभा अधिक नाट्यानुकूल आहे" पण मला तसे कधी वाटले नाही. कथेबद्दल मात्र मनांत निष्ठाच जोपासली गेली आहे. अशीच निष्ठा अरविंद गोखल्यांनी जपली आहे असे मला वाटते.

प्र:— बसल्या बैठकीत कथा पूर्ण होते?

चो:—होते. मधे पानबीन खायला उठतो. पण गोष्टीसाठी Gaps लागत नाहीत.

प्र:— लिहितांना pressure वगैरे जाणवते काय? की बसले की गति येते?

चो:—गति येते. बैठकीतच fair होते.

प्र:— आपल्या कथेचा पहिला वाचक?

चो:—जो मिळेल तो! पण सहसा कुणी नाही—संपादकच! कारण वेळच नसतो. पत्नीला कधी कधी वाचून दाखवतो.

प्र:—Plots आधी सांगता?

चो:—सहसा नाही.

प्र:— लेखनाची धुंदी वगैरे चढते? शीण नंतर येतो?

चो:—धुंदी वगैरे काही चढत नाही. लिहिणे संपविणे हा एक Routine चा भाग आहे असे वाटते. "अजून वाट बघतो आहे" ह्या कथेच्या वेळी मात्र स्फूर्ति, धुंदीचा अनुभव घेतला.

प्र:— 'सुषमा' हा संग्रह 'झाडांच्या सावल्यास' अर्पण केला आहे. त्यामागील काही कल्पना?

चो:—तरलतेसंबंधीच्या माझ्या कल्पनातून ते घडले आहे. काही कल्पनांचे मला आकर्षण आहे. 'सुषमा'चे कव्हर, 'अर्पण' ही कथा ही त्यांची उदाहरणे.

प्र:— नवकथेबद्दल आपली कल्पना?

चो:—मी नवकथा, जुनी कथा असे भेद मानीत नाही. तसे मानणे म्हणजे लेखनाच्या प्रक्रियेलाच नख लावण्यासारखे आहे असे मला वाटते.

प्र:— साहित्य विषयक Theories चा लेखनाला कितपत उपयोग होतो?

चो:—तो अभ्यास आवश्यक आहे असे मला वाटत नाहीं. मी वाचल्या नाहीत. मला त्या समजतही नाहीत.

प्र:— वाङ्मयीन प्रवासातला अत्यंत आनंदाचा क्षण? कसोटीचा क्षण?

चो:—'सती' लिहिल्यावर खूप आनंद झाला. सखी, संस्कार बद्दलही तसेच जाणवले. आणभाक, अर्पण, मजल बद्दलही असाच आनंद झाला. कसोटी 'सल'च्या वेळी जाणवली.

प्र:— आत्मचरित्राचा विचार?

चो:—नाही. तसं काही खास घडलं आहे असं वाटत नाही.

प्र:— वाङ्मयीन संसारात साथ करणाऱ्या व्यक्ति—पुस्तके?

चो:—व्यक्ति कुणीही नाही. चर्चा-विचार विमर्श केला नाहीं. पण काही लेखकांनी मला साथ सोबत केली आहे. झोलाचे Deep Impressions आहेत. चेकॉव्ह, मोपॉसा, शरद बाबू, पॅपिनी, ज्ञानेश्वरी ह्यांचे ऋण मोठे आहेत.

प्र:— कला जीवन विषयक दृष्टिकोन?

चो:—कला नसेल तर जीवनाला काही अर्थ राहणार नाही. कलेनेच आजचा माणूस संस्कारित केला आहे. त्याच्या जीवनाला क ही अर्थ दिला आहे. दृष्टि पडेल तेथे सौंदर्य फुलेल अशी माझी श्रद्धा आहे. अस्वच्छ मूल स्वच्छ होईल. असुंदर सुन्दर होईल ते कलेच्या स्पर्शाने ही माझी धारणा आहे.

प्र:— फक्त काही कथांच्या कुळकथा सांगाल काय?

चो:—ओघात ते आले आहे. नव्याने लिहिण्याची गरज नाही.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





